# अबोली

वि. स. खांडेकर

१९३८

किंमत १। रुपया.

माझे बालमित्र

प्रो. रामभाऊ जोशी

व

कै. महादेव रेडकर

यांस

# निवेदन

गेल्या दीड वर्षांत 'नवचंद्रिका' व 'चांदण्यांत', हीं दोन पुस्तकें मी मराठी रसिकांना सादर केलीं. त्यांचा त्यांनीं प्रेमानें स्वीकार केल्यामुळें आज हें तिसरें पुस्तक मी त्यांच्या हातांत देत आहें. याही पुस्तकाचें पूर्वीच्या प्रेमानेंच स्वागत करून प्रकाशनाच्या कार्यांत ते मला प्रोत्साहन देतील अशी मी आशा बाळगतों.

खांडेकरांच्या विविध कथांचा संग्रह 'अबोली' त वाचकांना आढळेल. या कथांना निवडक हें विशेषण मी मुद्दा-मच लावीत नाहीं. कारण एकाची आवड दुसऱ्याच्या आवडीशीं जुळेलच असें कुणी सांगावें ? शिवाय खांडेकरांचें कथालेखन गेलीं बारा वर्षे अव्याहत सुरू आहे व त्यांच्या कथांच्या विषयांइतकाच त्यांच्या लेखनपद्धतींतही बदल होत आहे. त्यामुळें त्यांच्या जुन्या कथांच्या चाहत्यांना नव्या कथा वाचतांना कांहींतरी चुकल्या-सारखें वाटतें; उलट त्यांच्या नवीन कथांच्या भोक्त्यांना जुन्या कथा पूर्णपणें पटत नाहींत. अबोलींत अशा सर्व प्रकारच्या वाच-कांची सोय करण्याचा मी प्रयत्न केला आहे.

खांडेकरांच्या गोष्टी कांहीं केवळ कथानकाकरितांच वाचल्या जात नाहींत हें सांगायला नकोच. भाषाप्रभुत्व, कल्पनाचमत्कृति, भावनाविलास, तंत्रवैचित्र्य इत्यादि कलागुण आणि दृष्टिकोनाचें अथवा स्वभावचित्रणाचें नावीन्य, जीवनाकडे व्यापक सहानुभूतीनें पाहण्याचें सामर्थ्य, तत्प्रतिपादनाला कलात्मक रूप देण्याचें कौशल्य इत्यादि विचारगुण यांचा संगम त्यांच्या कथांतून आढळतो, म्हणूनच त्या इतक्या लोकप्रिय झाल्या आहेत. त्या संगमांतल्या पाण्यानेंच 'अबोली' फुलली आहे एवढें सांगितलें म्हणजे पुरे.

माटुंगा (मुंबई)
ता. १-९-१९३८

प्रकाशक.

# अनुक्रम

## सुवास

'अय्या! अगदीं समाधि लागली आहे कीं!' रेखाचे हे शद्ब कानांवर पडले, तेव्हां कुठें शीलेनें पुस्तकांत खुपसलेलें डोकें वर केलें. तिनें मागें मात्र वळून पाहिलें नाहीं. गाढ झोंपलेल्या मुलाला बळेंच उठविलें म्हणजे त्याच्या हंसऱ्या चेहऱ्यावर विचित्र त्रासिकपणा दिसतो. शीलाची मुद्राहि तशीच झाली होती. रेखा लगबगीनें तिच्यापुढें येऊन उभी राहिली. फोटो काढणाऱ्यानें कॅमेरा व्यवस्थित करावा त्याप्रमाणें आपली दृष्टि शीलावर रोंखीत ती म्हणाली,

'रंगाचा भंग झाला वाटतं?'

शीलाच्या मुद्रेवर एक क्षीण हास्यरेषा चमकून गेली.

'पाहूं या तरी कुठली कादंबरी वाचीत होती स्वारी ती?'

शीलानें पुस्तक लपविलें असल्यामुळें रेखाला अधिकच संशय आला होता. शीला कांहीं केल्या तें दाखवायला तयार होईना. रेखा अगदीं रडकुंडीला आली असें वाटतांच मोठ्यानें हंसत तिनें तें पुस्तक

टेबलावर आपटलें. आतां रेखाचीहि हंसतां हंसतां पुरेवाट झाली. पुस्तक कसलें? तिचा पूर्वजन्मीचा वैरी होता तो....आलजिब्रा!

हंसतांहंसतां एखाद्या विचित्र प्राण्याकडे पहावें त्याप्रमाणें रेखाचे डोळे शीलेला पहात होते. प्रॅक्टिकलच्या जाचांतून पांच वाजतां सुटलेली शीला लगेच तासभर बीजगणित सोडवीत बसली होती! कुणी मोठें बक्षीस लावलें तरी आपल्या हातून हें दिव्य व्हायचें नाहीं.

कादंबरी वाचण्याचासुद्धां कंटाळा आल्यामुळें ती कालव्याच्या पाण्यांत खडे टाकीत आणि त्यांनीं निर्माण होणारीं वलयें पाहत किती तरी वेळ उभी राहिली होती. त्या बालिश क्रीडेंतच तिला एकदम कांचनाची आठवण झाली. हल्लीं तो भेटायला आला म्हणजे त्याच्या शद्बांनीं, फार काय स्मितानेंदेखील आपल्या मनांत असेच मधुर तरंग कां बरें निर्माण व्हावेत? लहानपणापासून त्याचा आपल्याशीं घरोबा आहे. दादाचा मित्र म्हणून तर तो अगत्यानें आपल्याला इथें भेटायला येतो. मग अलिकडेच आपल्या अंत:करणाला त्याच्याविषयीं अशी निराळी ओढ कां लागावी? विलक्षण मोहक सुगंधानें मन धुंद होऊन जावें, पण तो कुठून येत आहे हें कळूं नये, तसें तिला होत होतें. दोन महिन्यांपूर्वी लागलेल्या बोलपटांतली कांचनची पहिलीच भूमिका फार छान झाली, तो आपल्याला भेटायला येतो तेव्हां त्याला पाहण्याकरितां विद्यार्थ्यांची गर्दी होऊं लागली, हेंच या नव्या आकर्षणाचें कारण असलें पाहिजे, अशी तिनें आपल्या मनाची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. या गोंधळलेल्या मन:स्थितींत खड्याच्या ऐवजीं एक लहानसें ढेकूळ तिच्या हातून पाण्यांत पडलें. तरंग उठले, पण ते पाणी गढूळ करून!

लगबगीनें ती आपल्या खोलीकडे परत आली. आज ‘भाग्यचक्र’

बोलपट पाहण्याकरितां जायचें कांचननें ठरविलें आहे ही गोष्ट पांच वाजेपर्यंत तिच्या अगदीं चांगली स्मरणांत होती. प्रयोगशाळेंतील युगा-सारखा वाटणारा प्रत्येक क्षण या रमणीय सायंकाळच्या आशेनेंच तिला सुसह्य झाला होता. पण कालव्याच्या कांठीं झाडांच्या छायेंत उभें राहून जलतरंगाचा खेळ खेळतांखेळतां आपल्या मानससरोवरांतील तरंगांतच ती मग्न होऊन गेली होती.

बाहेर बैठकीच्या जागीं कांचन व शीला गप्पागोष्टी करीत बसली असतील अशी तिची कल्पना होती. आपण दिसतांच कांचन विचारील, ' काय रेखा, कुठं गेली होतीस पळून? ' आपण उत्तर देऊं–' सिनेमांतल्या लोकांना पळून जाण्यावाचून दुसरं काय सुचायचं आहे?' उजव्या हाताच्या बोटाभोंवतीं टोपी गरगर फिरवीत कांचन विचारील–'पण आज मी येणार हें ठाऊक होतं तुला!' आपण शीलाकडे पाहत म्हणूं–' मी नव्हतें म्हणून तुला कांहीं आभाळाकड पहात बसावं लागलं नाहीं ना? नी या वेळीं आभाळांत एक तरी चांदणी दिसेल कां? पण तुझ्यासमोर तर दोन छान शुक्र चमकताहेत. मग —'

शुभ्र चांदण्याच्या आशेनें अंगणांत यावें आणि बाहेर दाट काळोख पडलेला असावा, तसें रेखाचें झालें. कांचनाचा पत्ताच नव्हता कुठें! अर्थात् शीला वर खोलींत कांहींतरी वाचीत बसली असावी असा तिनें तर्क केला. पण ती जें वाचीत होती तें पाहतांच रेखा क्षणमात्र सुन्नच झाली! आलजिब्रा! आगींतून सुटल्यावर वाऱ्यावर जायचें कीं फोफाट्यांत पडायचें?

टेबलावर उजवें कोंपर टेकून ती म्हणाली,

' धन्य आहे बाई तुझी! '

शीलानें भुंवया तेवढ्या किंचित् मुरडल्या.

'शीला, तुला हृदयच नाहीं का ग?'

'कादंबऱ्यांतल्या नायकनायिकांना असतं तसलं नाहीं हें खरं!'

रेखाला हा टोमणा लागला नाहीं असें नाहीं. पण तो नकळत्या-वर घालून ती म्हणाली,

'कंटाळा कसा ग येत नाहीं तुला या रुक्ष विषयाचा?'

'चिखलाचा कंटाळा करून शेतकऱ्याचं चालेल का?'

'तुझ्यासारखे शेतकरी असले तर 'खेड्यांकडे चला' हा उपदेश करायचं कारणच पडणार नाहीं पुढाऱ्यांना! झुंडींच्या झुंडी धांवतील ना तिकडे?'

रेखाकडून होणारी स्वतःच्या रूपाची अशी अप्रत्यक्ष स्तुति वैधव्यांतहि शीलाला अप्रिय होती असें नाहीं. चांगल्या गायकानें गाणें ऐकून व्यक्त केलेला आनंदच गवयाला अधिक आवडतो. रूपाची स्तुतीहि रूपसंपन्न असलेल्याकडून होण्यांत स्वारस्य असतें. पण अशा वेळी शीलाला आनंद होत असला तरी तिच्या मुद्रेवर तो कधींच दिसत नसे. या वेळीं तर तिनें जांभईनेंच रेखाच्या या स्तुतीचा स्वीकार केला. एकदम चमकून रेखानें विचारलें.

'किती वाजले ग?'

भिंतीकडे पाठ करून ठेवलेलें मोठें घड्याळ शीलानें सुलट केलें. सहा तर होऊन गेले होते. शीला हें करीत असतांना तिच्या मनगटावर घड्याळ नाहीं हें रेखाच्या लक्षांत आलें.

'रिस्टवॉच् कुठं गेलं तुझं?'

'दिलंय्!'

'कुणाला?'

'कांचनांना'

कांचन आला केव्हां आणि शीलानें आपलें घड्याळ त्याला दिलें केव्हां, हें रेखाला कोडेंच पडलें! कांचननें आपलें घड्याळ न मागतां शीलेचें न्यावें, याचें तर तिला अधिकच वैषम्य वाटलें. एरवीं ती फुरंगटूनच बसली असती. पण कुतूहल हें डोळयांत गेलेल्या कणासारखें असतें. तें मनुष्याला कांहीं केल्या गप्प बसूं देत नाहीं.

'कांचनला कशाला हवं होतं घडयाळ?'

'नवा बोलपट सुरू आहे ना त्यांचा? माझं घडयाळ त्यांना फार आवडलंय्—'

'घडयाळच आवडलं की—'

शीलाच्या मुद्रेकडे पाहतांच रेखाला अधिक बोलण्याचा धीर झाला नाहीं. मत्सराचें कुसळ नकळत तिच्या मनाला बेचैन करीत होतें. आपण सहापर्यंत आलों नाहीं तर तुम्हीं दोघी परस्पर थेटरावर या असें त्यानें शीलाला सांगितलें आहे, हें ऐकतांच तें कुसळ अधिकच खोल गेलें.

शीलाच्या आग्रहावरून गांवांत चालतच जायचें ठरलें. नदींतल्या मधल्या वाटेनें जायला हरकत नव्हती. जातां जातां पायवाटेच्या बाजूला एक छोटीशी बंगली लागली. तिच्यांतून फुललेल्या पारिजाताचा मधुर सुवास दूरवर दरवळत होता. रेखाच्या मनांत एकदम एक इच्छा उत्पन्न झाली—बंगलीच्या आवारांत जाऊन थोडी फुलें घेऊन यावींत. ती थांबलीदेखील. पण शीला तिच्याबरोबर येण्याचें लक्षण दिसेना. ती शीलाला म्हणाली,

'तुला नसतील हीं फुलं आवडत?'

'रेखा, तूं नी मी एका खोलींत वर्षभर राहतोयू; पण मी माणूस आहे अशी कांहीं तुझी खात्री झाली नाहीं अजून!'

'पारिजाताची फुलं इतकी जवळ असल्यावर माणूस थोडंच गप्प बसेल ?'

'न बसायला काय झालं ?'

'फुलं न घेतांच !'

'सुवास मिळाल्यावर फुलं हवींतच असा हट्ट धरून चालत नाहीं या जगांत ! फुलं काय, चार घटकांत कोमेजून जातील ! त्यापेक्षां दुरूनच सुवासाची स्मृति घेऊन जाणं बरं नाही का ?'

  

बोलपट पाहतांना रेखाचें मन अधिकच अस्वस्थ झालें. कांचननें काम केलेला बोलपट लागला होता, तेव्हां दोघींना घेऊन आतांप्रमाणेंच तो बॉक्समध्यें बसला होता. पण शीला बाजूला, आपण मध्यें व कांचन दुसऱ्या बाजूला, असे आपण बसूं अशी रेखाची अपेक्षा असावी. पण घडलें मात्र निराळेंच ! कांचन आपणहून मधें बसला. बोलपट सुरू झाल्यावर तो एखादें वाक्य बोले तें शीलाशींच. जणुं कांहीं त्याच्या उजव्या बाजूला रेखा नांवाची एक पुतळीच बसली होती ! विश्रांतीच्या वेळीं झालेल्या कथाभागासंबंधानें बोलणें निघालें. आंधळ्या सूरदासाचें वात्सल्य हृदयस्पर्शी आहे, याविषयीं सर्वांची एकवाक्यता झाली. मात्र रेखाचें म्हणणे स्त्रीभूमिकांत नायिका रूपकुमारी हीच उत्कृष्ट आहे असें पडलें. कारण नायक हा एक पाळलेला मुलगा असूनहि प्रेमामुळें ती त्याच्याबरोबर पळून जाते. उलट शीलाला आंधळ्या सूरदासाचें- आणि त्यानें घरीं आणलेल्या अनाथ अर्भकाचें पालन करणारी 'कलङ्की मा' अधिक आवडली. रूपकुमारीचा त्याग हें भोगाचेंच थोडेसें उच्च स्वरूप आहे. पण 'कलङ्की मा'चा त्याग पूर्णपणें उदात्त आहे,

असें तिनें सांगितलें, तेव्हां कांचननेसुद्धां मान डोलविली. ‘शीलाच्या घड्याळाप्रमाणं तिची मनंसुद्धां आवडायला लागलीं वाटतं तुला?’ असा यावर हंसत हंसत टोमणा मारण्याचा रेखानें प्रयत्न केला; पण तिच्या स्वरांत तिच्या मनांतील राग प्रगट झाल्याशिवाय राहिला नाहीं.

कांचनावर आपलाच अधिक हक्क आहे असें रेखाला या घटकेपर्यंत वाटत होतें. आधीच बाळपणांतील ओळख बकुळीच्या फुलासारखी असते. तिचा सुवास कधी जात नाहीं गतवर्षी कांचन विश्वविद्यालयाच्या बी. ए. च्या दारानें निघून गेला, त्याच वेळीं रेखानें मॅट्रिकच्या दारानें त्यांत प्रवेश केला. पण तेव्हां तिनें विद्यालयप्रवेश करावा की गृहप्रवेश करावा याविषयीं घरांत बरीच भवति न भवति झाली होती. महत्वाकांक्षी कांचन स्वतःला कुठल्यातरी जुनाट घाण्याला जुंपून घ्यायला तयार नव्हता. कॉलेजांतल्या नाटकांत त्यानें केलेल्या भूमिका पाहून चांगल्या चांगल्या रसिकांनीं त्याची पाठ थोपटली होती. धोपटमार्ग सोडून नव्या पाऊलवाटेनें जाण्याचा त्यानें निश्चय केला. चित्रपटसृष्टींत पहिलीं चारपांच वर्षं कष्टाचीं गेलीं तरी कीर्ति, द्रव्य, समाजसेवा इत्यादि गोष्टींचें क्षेत्र तिथें संकुचित राहणार नाहीं, अशी त्याची खात्री होती. रेखाच्या दादाशीं बोलतांना मनापासून हंसत हंसत त्यानें जें वाक्य उच्चारलें होतें, तें ती अजून विसरली नव्हती—

‘ताक घुसळून फार तर लोणी मिळतं; पण समुद्रमंथन केलं तर अमृत पदरांत पडतं!’

थट्टेखोर दादा म्हणाला होता,

‘सिनेमाचं जग आहे हं हें कांचन. अमृताच्या आधीं अप्सराच दिसायच्या तिथं तुला!’

प्रतिकोटि म्हणून कांचननें उत्तर दिलें होतें,

'अमृताच्या मागें लागणाराला अप्सरा नी हालाहल, दोन्हीं पचविलीं पाहिजेत.'

तसें पाहिलें तर कांचन व रेखा यांचा वाङ्‌निश्चय झाला होता असें नाहीं. पण वडील मंडळीच्या वारंवार होणाऱ्या बोलण्यामुळें सर्वांचाच तसा समज झाला होता. वायुलहरीवर वाहून येणाऱ्या सुवासानें मुग्ध होऊन एखाद्यानें त्या अदृश्य पुष्पाचें रम्य रूप डोळ्यांपुढें उभें करावें, याप्रमाणें रेखानें अनेक सुखस्वप्नांत कांचनाची प्रियपत्नी म्हणून भूमिका केली होती. चित्रपटसृष्टींतलें आपलें पाऊल स्थिर होईल कीं नाहीं याविषयीं कांचन साशंक असल्यामुळें गतवर्षी लग्नाचें बोलणें जिथल्या तिथें राहिलें नि रेखा कॉलेजांतली विद्यार्थिनी झाली.

त्या नव्या मुग्ध जगांत रेखा हीं स्वप्नें विसरूनहि गेली असती. पण वारंवार होणाऱ्या कांचनाच्या दर्शनानें तिच्या अंतर्मनांतील भावनांचे मुके झरे बोलके होत. पहिल्याच चित्रपटांतील कामानें कांचन कॉलेजविद्यार्थ्यांचें दैवत झाला. त्याच्या लोकप्रियतेनें हे बोलके झरे बाहेर उचंबळून येऊं लागले. गेल्या नाताळांत दादा भेटायला आला होता, तेव्हांच्या त्याच्या संदिग्ध संभाषणानें तर या उचंबळून येणाऱ्या भावनांचीं कारंजीं थै—थै नाचूं लागलीं. उत्कंठेच्या सूर्यकिरणांनीं त्यांच्यावर नाचणारीं भावी जीवनांतलीं चिमुकलीं इंद्रधनुष्यें—

दादानें रेखाला विचारलें होतें,

'तुझ्या राशीचं भविष्य वाचलंस का नव्या वर्षाचं?'

'कांहींकांहीं वर्तमानपत्रांत तेवढाच भाग वाचण्यासारखा असतो, नाहीं?'

'तुझ्या राशीच्या माणसांना लग्नयोग आहे म्हणे यंदा!'

' अगदीं म्हाताऱ्या आजीबाईना सुद्धां ? '

तिच्या या प्रश्नानें दादा केवढ्यानें हंसला होता! मात्र मग तो जें कांहीं बोलला ती कांहीं थट्टा नव्हती. कांचनाला पहिल्याच कामानें आत्मविश्वास उत्पन्न झाला. पण त्याबरोबरच दोनतीन वर्षें तरी लग्न न करण्याचा त्याचा निश्चय डळमळूं लागला. नऊ ते सहा पर्यंत स्टूडिओंत काम करून आल्यावर तो अगदीं कंटाळून जाई. कित्येक वेळां त्याला रात्रीच्या रात्री अलोचन जागरणें घडत. त्याच्या शिणलेल्या शरिराला आणि कंटाळलेल्या मनाला स्वत:च्या खोलींतला एकांतवास अंधारकोठडीसारखा भयाण वाटे. ' गिरणींतला मजूर दारू कां पितो याची कल्पना आत्तां मला यायला लागली आहे ' असें कांहींसें रेखाच्या समोरच तो बोलला होता. दादानें ' रोग नी मोह यांच्या बाबतींत आधींच सावध असलेलं बरं ' असें त्याला उत्तरहि दिलें होतें. पुढें त्या दोघांचें काय बोलणें झालें हें रेखाला कळायला मार्ग नव्हता. पण दादाच्या भविष्याच्या प्रश्नानें त्याचा भावार्थ तिच्या सहज लक्षांत आला.

विश्रांतीनंतरचा चित्रपटाचा भाग आकर्षक असूनही रेखाला तो नुसता यमपुरींतल्या बाहुल्यांचा नाच वाटला. तिचे डोळे मधून-मधून गेल्या वर्षांतील आपल्या जीवनपटावरलीं चित्रें पहात होते— कॉलेजांत गेल्यावर खोलींतली मैत्रीण म्हणून शीला आपल्या आयुष्यांत आली. आपल्यापेक्षां वयानें तीनचार वर्षांनीं मोठ्या असलेल्या आणि वैधव्यामुळें अकालीं गंभीर झालेल्या मैत्रिणीशीं आपलें कसें काय जुळेल अशी पहिल्या दिवशीं भीति पडली होती आपल्याला! पण ती भीति हां हां म्हणतां पळून गेली आणि तिची जागा प्रीतीनें घेतली.

केवळ वडील बहिणीच्या वात्सल्याचाच आपल्याला लाभ झाला असें नाहीं. गणितासारख्या कच्च्या विषयांतली शिकवणीसुद्धां बसल्या जागीं फुकट मिळाली. शीला डॉक्टरीण होण्याकरितां पुढें दीड वर्षानें पुणें सोडून जाणार ही कल्पना दु:सह वाटण्याइतका तिचा लळा लागला आपल्याला.

आपल्याकडे येणाऱ्या कांचनशीं तिचा परिचय सहजच वाढत गेला. आणि त्याचा परिणाम?—स्नेह आणि वैर यांच्या सीमा एक-मेकांना इतक्या बिलगून असाव्यात ना?

आपल्या तंद्रींतून जागें होऊन तिनें कांचन व शीला यांच्याकडे पाहिलें. दोघेंहि हंसत होतीं. चित्रपटाकडे लक्ष नसल्यामुळें रेखानें या हंसण्याचा विपरीतच अर्थ केला!

बोलपट संपल्यावर उठतां उठतां शीला म्हणाली,

'कसं आहे चित्र रेखाताई?'

'छान!'

'आंधळा आवडला कीं नाहीं तुला'

'आंधळा आवडायला मी कांहीं आंधळी नाहीं शीलाताई!'

तिच्या या उत्तरानें शीला चमकली! पण लगेच कांचनकडे वळून म्हणाली, 'दीपक नि रूपकुमारी यांना आत्तांच विसरून गेलें मी. पण आंधळा सूरदास, नि कल्हकी मा, यांची आठवण मात्र पुष्कळ दिवस राहील मला!'

'फुलाचा रंग मनुष्य लवकर विसरतो, पण त्याचा सुवास कांहीं विसरतां येत नाहीं त्याला.' कांचननें उत्तर दिलें.

फुलें! सुवास! कांचन आणि शीला यांचीं मनें मिळाल्यामुळें त्यांचे उद्‌गारसुद्धां एकरूप झाले आहेत असा रेखाला भास झाला.

  

कांटा टोंचलेल्या जागीं सुईनें खूप टोंकरावें, पण कांटा मिळूं नये आणि टोंकरल्यामुळें पाय मात्र दुखूं लागावा, तसें रेखाचें झालें. त्या रात्रीं स्वस्थ अशी झोंप तिला आलीच नाहीं. एखाद्या खोडकर मुलाप्रमाणें तिचें मन अर्धवट झोंपेंतहि चाळे करीत होतें. कांचननें शीलाकडून धड्याळ केव्हां नेलें हें रेखाला ठाऊकच नव्हतें. आपण नसतांना त्या दोघांच्या गांठीभेटी होतात हें ओघानें आलेंच! ज्या भूमीवर आपण सुखमय भविष्याचें मंदीर उभारीत होतों, तिचें स्वामित्व दुसऱ्याकडे जात आहे ही कल्पना रेखाला अगदीं असह्य झाली.

दुसरे दिवशीं सकाळीं ती उठली ती मलूल मुद्रेनेंच. पहाटे उठून आलजिब्रा सोडवीत बसलेल्या शीलानें खुर्चीवरूनच तिला विचारलें,

'आज कळी कोमेजलीशी इतकी?'

'ऊन पाण्यांत कळ्या उमलतात का कधीं?'

रेखाचें कांहींतरी बिनसलें आहे अशी शीलाची खात्री झाली. पण तीहि कांहीं कमी मानी नव्हती. परीक्षेंत पाहिला वर्ग पटकावयाचा असल्यामुळें तिला आवंढा गिळायलाहि फुरसद नव्हती. रेखानें मौनव्रत धरलें हें अभ्यासाच्या दृष्टीनें तिच्या पथ्यावरच पडलें. एकदोनदां रेखाची विचित्र दृष्टि पाहून तिला कसेसेंच वाटलें! तिच्या गळ्यांत गळा घालून, ती कां कुढत आहे हें विचारण्याचा उमाळासुद्धां तिला आला. पण तिच्या प्रेमळ हृदयाला अभिमानानें मागें ओढून धरलें

आणि ती स्वस्थ बसली. कांचनानें पाठविलेल्या पत्राचें पाकीट आपण फाडून टोपलींत टाकलें होतें याची शीलाला आठवणहि नव्हती; मग ते तुकडे घेऊन त्याच्यावरील अक्षरें न्याहाळीत रेखा किती वेळ बसली होती याची तिला कुठून कल्पना येणार?

रेखा आणि शीला यांच्या खोलींतली नेहमींची किलबिल कमी झाल्याची जाणीव इतर विद्यार्थिनींनासुद्धां झाली. त्या शांततेचें त्यांना आश्चर्य वाटलें नाहीं असें नाहीं. 'परिक्षेच्या वादळापूर्वीची शांतता दिसतेय् ही' असें बोलून त्यांनीं आपलें समाधान करून घेतलें.

पण परिक्षेच्या वादळाची शीलाला यत्किंचितहि भीति वाटत नव्हती. रेखाच्या मनांतल्या वादळाची मात्र तिला कांही कल्पना येईना! तिचें घुमेपण वाढूंच लागलें. उखाण्याशिवाय तर ती बोलतच नसे मुळीं! एकदां हातांत पुस्तक घेऊन वर शून्य दृष्टीनें पाहणाऱ्या रेखाला शीला म्हणाली,

'परीक्षा जवळ आली हं रेखा!'

'तुझी! माझी नाहीं.'

एवढेंच उत्तर देऊन तिनें डोळे झांकून घेतले.

परंतु या वादळाचा अंत अगदीं अनपेक्षित रीतीनें झाला. रेखाचा दादा एके दिवशीं अचानक आला आणि त्यानें तिचें लग्न लवकरच होणार असल्याची मंगल वार्ता सर्वांना कळविली. 'आतां काय नटी होणार तूं!' म्हणून बरोबरच्या विद्यार्थिनींनीं रेखाला चिडवायला सुरवातहि केली. थट्टा किती गोड असूं शकते याचा अनुभव ती घेऊं लागली.

अहेराच्या वेळीं रेखाच्या इतर आवडत्या वस्तूंबरोबर एक पुस्तकहि शीलानें दिलें.

'आलजिब्रा नाहीं ना?' रेखानें खट्याळपणानें विचारलें.

शीला नुसती हंसली.

रेखानें पुस्तकाचें वेष्टन सोडून पाहिलें. एका प्रसिद्ध कादंबरीकाराची नवी कृति होती ती!—'सुवास'

रेखाच्या डोळ्यांपुढें पारिजाताचीं फुलें आणि भाग्यचक्र बोलपट उभा राहिला.

सुखाचा काळ कसा हरिणासारखा धांवतो. परिक्षेच्या हुसक्यानें रेखा एखादे वेळीं भिऊन जागी होई आणि आपण लवकरच माता होणार या जाणीवेनें स्वत:शींच लाजून उशींत तोंड लपवी. या लाजऱ्या मन:स्थितींत तिच्या डोळ्यांपुढून गेल्या वर्षांतलीं विविध दृश्यें हंसत हंसत निघून जात. महाबळेश्वरांतल्या मधुचंद्राचें चांदणें अजून आपल्या भोंवतीं पसरलेंच आहे असा तिला भास होई. जूनमध्यें लागलेल्या दुसऱ्या बोलपटांतलें कांचनचें काम तर पहिल्यापेक्षांहि उठावदार वठलें होतें. त्या बोलपटांतील एकच गोष्ट रेखाला आवडली नाहीं. ती म्हणजे कांचनच्या मनगटावर चमकणारें शीलाचें घड्याळ.

आणि सप्टेंबर—आक्टोबरांत कांचन व रेखा फिरायला जात तेव्हां शीला त्यांना बहुधा भेटे. एकदां कांचननें तिला आपल्या चालू असलेल्या बोलपटाचें शूटिंग पहायला येण्याचा फार आग्रह केला. तिनें हंसत हंसत उत्तर दिलें,

'आमचंहि शूटिंग चालू आहे कीं!'

'कसलं?'

'घोकंपट्टीचं! या कथानकांत फिजिक्स नवरा, केमिस्ट्री त्याची बायको. बाई स्वभावानं फार गरीब; पण नवरा मात्र—

कांचनच्या हंशामुळें पुढचे शब्द तिच्या तोंडांतून बाहेरच पडले नाहींत. तथापि 'मार्चमध्यें परीक्षा संपली कीं तुमचं शूटिंग, रेखाचं कुकिंग, सारंसारं पहायला नी रहायला येणार आहें मी!' असें आपणहूनच तिनें सांगितलें.

कांचनच्या आग्रहामुळें बाळंतपण पुण्यांतच करायचें ठरलें. रेखाची एक विधवा मामी घरांत रहायला येणार होतीच. रेखाची प्रकृति सहाव्या सातव्या महिन्यापासून फारशी चांगली नव्हती. म्हणून तिच्या दादानेंहि तिला माहेरीं नेण्याचा हट्ट धरला नाहीं.

योग्य वेळीं रेखाची सुखरूप सुटका होऊन मुलगा झाला. तिच्या प्रकृतीवरून तिला ताप येईल अशी डॉक्टरांना भीति होती; पण पहिला दिवस अगदीं उत्तम गेला. दुसरे दिवशीं कांचनबरोबर शीला सूतिकागृहांत आली. तिची परीक्षा संपली असून ती रेखाच्या घरींच आजपासून रहायला येणार होती. 'बारशाच्या तयारीलाच आलें आहे मी भाच्याच्या' हे तिचे उद्गार ऐकून रेखा खुदकन् हंसली; पण पलंगावर पडल्या–पडल्या कांचन व शीला यांच्या जोडीनें जाणाऱ्या पाठमोऱ्या मूर्ती तिनें पाहिल्या. नकळत ती स्वतःशीं विचार करूं लागली. दुसरे दिवशीं तिला थोडा ताप आलेला पाहून डॉक्टरांना आश्चर्य वाटलें. कांचन व शीला आठ दिवस घरांत अनिर्बंध रहाणार या गोष्टीवर तिनें रात्रभर विचार केला होता, ही गोष्ट तिथें धन्वन्तरी असता तरी त्याच्या लक्षांत आली नसती!

अकराव्या दिवशीं रेखा घरीं आली ती कुरमुरीत स्थितींतच! कांचनच्या बोलपटाची तर अगदीं लग्नघाई सुरू झाली होती. अर्थात् बारसें लांबणीवर टाकणें भागच होतें.

मधल्या आठ दिवसांत शीला काय करीत होती, याची रेखानें

मामीच्यापाशीं हळूच चौकशी केली. दोघे अपरात्रीं फिरायला जात, घरीं फोनो लावून हंसतखिदळत बसत, एकदां तर कांचननें दिलेलें फूल या विधवा पोरीनें आपल्या केंसांत खोंवून आरशापुढें जाऊन आपला चेहरा पाहिला, एक ना दोन—शंभर गोष्टी मामीनीं रेखाला सांगितल्या. कांचननें आपल्याला फसविलें, निदान आज ना उद्यां तो आपला विश्वासघात करणार, या गोष्टीपलिकडे रेखाचें चित्त धांवच घेईना. आपला पति कुशल नट आहे याचा तिला केवढा अभिमान वाटत असे! पण तोच आतां अवगुण झाला! दर चित्राला नव्यानव्या मोहक नटी ज्याच्या दृष्टीला पडायच्या, त्याचें आपल्यावरचें प्रेम अढळ कसें राहणार, असें ती आतां उलट स्वतःला विचारूं लागली. दुर्बळ प्रकृतीमुळें अनेकवेळां कांचनाच्या आनंदाचा आपल्या हातून विरस झालेला तिला आठवला. एकदां महाबळेश्वराला फिरायला गेल्यावर आपण विचारलें होतें—'घाईशी केली एवढी लग्नाची?'

त्यानें सांगितलेलें सगळेंच कांहीं तिला समजलें नव्हतें. पण त्याला स्वतःचीच भीति वाटत होती, एवढें मात्र त्यावेळीं तिला कळून चुकलें होतें. तो पुरावाहि आतां त्याच्या विरुद्धच जाऊं लागला.

कांचनाबरोबर शीला दररोज रात्री शूटिंग पहायला जाई. संध्याकाळींहि दोघे फिरायला जात. शीला घरची मालकीण असून आपण पाहुण्या आहोंत ही विकृत कल्पना अंथरुणावर पडल्यापडल्या रेखाच्या मनांत थैमान घालूं लागली. शीलाला मधून मधून घरांतलें काम करावें लागतें हें पाहून एकदां कांचन म्हणाला,

'घरासारखं व्हावं लागतं हं पाहुण्याला!'

'सारखं कसलं? घरच तिचं आहे कीं!' रेखा उद्गारली.

शीलानें रेखाकडे पाहिलें! तीच वर्षापूर्वीची विचित्र नजर! तिच्या

..नांत प्रकाश पडला. मत्सराच्या विषावांचून डोळे असे तारवटायचे नाहींत. रेखाचें पदोपदीं घालूनपाडून बोलणें चटकन् तिच्या ध्यानांत आलें. कांचन बाहेर गेलेला पाहून तिनें रेखाचा निरोप घेतला.

शीला एकदम कां निघून गेली हें कांचनच्या लक्षांत आलें नाहीं! रेखाकडून कांहींच कळेना! दोघींचें कांहींतरी भांडण झालें असावें, एवढें मात्र त्यानें ताडलें. दुसरें दिवशीं सकाळपर्यंत वाफ निघून जाईल या कल्पनेनें तो स्वस्थ राहिला.

सकाळच्या पत्रांत रेखाच्या नांवचें एक पत्र होतें. वरचें अक्षर शीलाचें आहे हें कांचननें ओळखलें. त्याचें आश्चर्य द्विगुणित झालें. रेखाला पत्र देऊन तो बाहेर आला. थोडया वेळानें त्यानें आंत पाहिलें. रेखा डोळे पुशीत होती. तिचें सांत्वन करण्याकरितां तो आंत गेला. तिनें त्याच्या हातांत दोन पत्रें टाकिलीं. त्यांतलें एक तर त्यानें स्वतःच वर्षापूर्वीं लिहिलेलें होतें. शीलाचें पत्र तो वाचूं लागला,

'प्रिय रेखाताई,

'तुझी प्रकृति अधिक बिघडूं नये, म्हणून मीं एकदम निघून आलें. कांचनना म्हणावें, मला क्षमा करा.

'रेखाताई, मी माणूसच आहें, राग–लोभाप्रमाणें मत्सरहि जगांत असायचाच, हें मला कळतें. पण त्याला कांहीं आधार, मर्यादा नाहीं का? गुलाबाच्या वासासाठीं त्याचे कांटे बोंचले तरी कुणी पर्वा करीत नाहीं; पण मुद्दाम बाभळीच्या कांट्यांवरून चालत जाण्याचा वेडेपणा कोण करील?

'सोबत कांचनांचें तुझ्या लग्नापूर्वीं कितीतरी आधीं मला आलेलें पत्र पाठविलें आहे. त्यांचें प्रेम मला हवें असतें तर त्यांच्या

मागणीला मी नकार दिलाच नसता. डॉक्टरीण होऊन मिशनरी लोकांप्रमाणें खेडयापाडयांत काम करण्याचें ध्येय मला हांक मारीत नसतें, तर मी आनंदानें त्यांची पत्नी झालें असतें. मी 'नाहीं' म्हटलें. तूं त्यांची राणी झालीस. तुझ्या वैभवाचा मीं क्षणभरहि हेवा केला नाहीं, करणार नाहीं.

'पण पत्नी झालें नाहीं म्हणून मी त्यांची मैत्रीणहि होऊं नये हा कोणत्या मुलखांतला न्याय? स्त्रीपुरुषांच्या स्नेहाकडे निर्मळ दृष्टीनें आपल्याला पाहतांच येत नाही अजून! सोडतीतलें दहा हजारांचें बक्षीस न घेतां एखाद्यानें दहा रुपयांची चोरी केली ही गोष्ट तुला खरी वाटेल का?

'रेखाताई, फुलाजवळ जाणारें मनुष्य मधासाठींच जात आहे असें फुलपांखराला वाटतें. दूर उभें राहून सहज येणाऱ्या सुवासावर संतुष्ट होणारीं माणसें असतात याची कल्पना त्याला कशी आणून द्यायची? अधिक–उण्याबद्दल क्षमा कर. बाळाला गोड पापा. त्याचें नांव ठेवल्यावर मला कळव हं.

तुझी

**शीला**'

  

रेखाच्या आग्रहावरून बारशाकरितां आपण बोलवायला आल्याचें कांचननें सांगतांच शीला चकित झाली. आपल्या मनाचा गोंधळ लपविण्याकरितां तिनें विचारलें,

'नांव काय ठरलं बाळाचं?'

'सुवास.'

१९३७

# महादेवाचें देऊळ

महादेवाच्या आईचा कोमेजलेल्या फुलाप्रमाणें दिसणारा चेहरा डोळ्यापुढें उभा असल्यामुळें माझें मन अगदीं सुन्न होऊन गेलें होतें. एकुलता एक मुलगा कायदेभंग करण्याकरतां जाण्याचा हट्ट घेऊन बसलेला! वीसबावीस वर्षें फुलाप्रमाणें तळहातावर खेळविलेला आपला जीव तुरुंगांतील निर्दय शिपाई पायाखालीं तुडविणार! सोन्याच्या पोचींनें खुलून दिसणाऱ्या त्याच्या हातांत खराटा देऊन सरकार त्याला रस्ते झाडायला लावील! पित्तानें कपाळ दुखूं लागलें तर तुरुंगांत सुंठ देखील मिळायची नाहीं; मग सूतशेखराची गोष्ट हवी कशाला? एक ना दोन, किती विचार त्या माउलीच्या मनांत उचंबळत असतील! माझ्याकरितां चहा करायला ती केव्हांची स्वयंपाकघरांत गेली होती. अजून ती चहा घेऊन कशी आली नाही, असा विचार मनांत आला, तोंच तिच्या डोळ्यांतून वहाणाऱ्या पाण्यानें चुलींतला विस्तवच विझून गेला असेल, अशी विलक्षण कल्पना त्याच्यांत चटकन् चमकून गेली. महादेव व मी जिवश्चकंठश्च मित्र असल्यामुळें त्याची आई मला स्वतःच्या आईसारखीच वाटे. तिचें दुःख कमी कर-

ण्याचा शक्य तो प्रयत्न आपण केला पाहिजे, असें वाटून मी महादेवाला म्हणालों,"महादेव, तुम्हां देशभक्तांना हृदयच नसतं का रे?

"हृदय असतं, पण तें मी आणि माझं कुटुंब एवढ्याचाच समावेश करण्याइतकं संकुचित नसतं"

"पण आईचे अश्रू पाहून—"

"माझ्या आईच्या अश्रूंकडे लक्ष देऊन जर मी माघार घेतली, तर आईच्या आईचे, तुझ्या माझ्या सर्वांच्या आईचे अश्रू तसेच वहात रहाणार नाहींत का? कोय स्वत:ला जमिनीत पुरून घेते म्हणूनच जगाला गोड आंबे खायला मिळतात."

इतक्यांत आईनें माझ्यापुढें चहाचा व महादेवापुढें दुधाचा पेला ठेवला. पितळेच्या पेल्यांतील चहा हात पोळेल म्हणून झटकन् मी बशीत ओतला आणि आईकडे वळून म्हणालों, "आई, महादेव कांहीं ऐकत नाहीं माझं!" स्वच्छ आकाशांत एकदम अभ्रें यावीत त्याप्रमाणें तिचा चेहरा मलूल झाला. ती डोळे पुशीत पुशीत म्हणाली, "महादेव, तूं गेला नाहींस तर चालणार नाहीं का रे?"

"न चालायला काय झालं? जग कुणासाठींच अडून बसत नाहीं, आई."

"तूं सगळी इष्टेट देऊन टाकलीस तरी मी हूं का चूं करणार नाहीं. पण या म्हातारपणीं मला सोडून जाऊं नकोस रे बाळ!"

महादेवाचें तोंड गोरेंमोरें झालें. आकाशांतून चांदण्या गळून पडाव्यात त्याप्रमाणें त्याच्या डोळ्यांतून अश्रू ठिबकूं लागले. आईनें जवळ येऊन पाठीवरून हात फिरवितांच त्यानें तिच्या कुशींत डोकें खुपसलें. महादेवाचें सांत्वन करीत आई म्हणाली, "बाळ, आईची माया आणि पाणी काढायचा राजू ही दोन्हीं सारखींच असतात बरं!

कळशीच्या गळ्याभोवतीं दोराचा फांस असतो म्हणूनच ती विहिरींत बुडत नाहीं. पण तूं तर सगळेच पाश तोडायला लागला आहेस—"

आईच्या या बोलण्याचें आम्हां दोघांनाहि हंसूं आलें. तसें पाहिलें तर ती कांहीं फार शिकलेली नव्हती. पण प्रेम मुक्याला बृहस्पती व पांगळ्याला मारुती करतें. लोखंड तापलेलें असेपर्यंतच त्याच्यावर घाव घालण्यांत फायदा असतो हें जाणून मीहि लगेच म्हटलें "महादेव, कांहीं झालं तरी स्वार्थत्याग आंधळा असूं नये. तूं कायदेभंगाकरितां निघून गेलास तर आईच्या डोळ्यांचं पाणी खळणार नाहीं. पण त्यानं देशाच्या पदरांत कांहीं पडेलच अशी खात्री कुठं आहे?" माझा हा श्रद्धाहीन प्रश्न ऐकतांच महादेवाच्या डोळ्यांतील तेज पुन्हां लकाकूं लागलें. तो आवेशानें म्हणाला, "मरणाच्या दारीं पडलेल्या पोराकरितां आई आपलं सर्वस्व खर्च करते. माझं मूल जगेल अशी हमी द्याल तरच मी पैसा खर्च करीन, असं ती वैद्याला म्हणते कां? झालं तर मग! बाकी तुम्हां लोकांना हें कधींच समजायचं नाहीं. चैनीची दारू पिऊन तर्र झालेल्यांना देव काय नी दगड काय, सारखेच. आम्हाला वाटतं कीं देश हा देवांचा देव—महादेव आहे. या महादेवाचे देऊळ?—"

"म्हणजे स्मशान!" मी चिडून मध्येंच म्हणालों. महादेवानें कायदेभंग न करणाऱ्या लोकांना दारूबाजांच्या पंक्तीला बसविलेलें पाहून मला राग आला होता.

महादेव पुढें कांहींच बोलला नाहीं. तो महात्माजींच्या फोटोकडे एकाग्र दृष्टीनें पाहूं लागला. मातृप्रेम व देशप्रेम यांच्या या द्वंद्वयुद्धाचा समाधानकारक निकाल लागणें शक्य नाहीं, असें वाटून मी तोंडाला कुलूप घातलें. महादेवाच्या डोळ्यांत गंगायमुना आल्या असल्या तरी त्याचे

मन मेरुमंदाराप्रमाणें अचल होतें. शेवटीं आईचा शद्ब मोडवेना म्हणून प्रथम गोमन्तकांत म्हाडदळला कुलदेवतेच्या दर्शनाला जायचें त्यानें कबूल केलें. आईच्या आग्रहावरून मीही निघालों.

  

काळोखांतून आमची बोट मालवण सोडून वेंगुर्ल्याकडे जात होती. महादेव कठड्यावर रेलून आशेच्या किरणांप्रमाणें दिसणाऱ्या तारकांकडे पहात होता. आई अंथरुणावर पडून देवी काय प्रसाद देईल याचा विचार करीत होती. देवीचा प्रसाद अगर कौल याचा निकाल ती न्यायाधीशाप्रमाणें मान्य करील, याविषयीं मला मुळींच शंका नव्हती. पण इंग्रजी शिकलेल्या महादेवानें—आईच्या डोळ्यांतील पाण्यानेंहि विरघळून न जाणाऱ्या महादेवानें देवाच्या दगडी मूर्तीच्या अंगावरील तांदूळ अगर पानें यांच्या हवालीं आपलें नशीब करावें, याचें मला राहूनराहून आश्चर्य वाटत होतें. देवीनें 'जाऊं नकोस' असा प्रसाद दिला तर महादेव काय करील? देवाचे प्रसाद अगर कौल जर बिनचूक ठरते तर साऱ्या खटल्यांचा निकाल देवळांतच लागला असता आणि वकिलीचा अभ्यास करायला एकहि विद्यार्थी धजला नसता! पडावांत बसतांना ही माझी शंका मी महादेवापाशीं बोलूनहि दाखविली, 'भाव तिथें देव' एवढेंच तुटक उत्तर देऊन तो वल्ह्यांनी उसळणाऱ्या पाण्याकडे पाहूं लागला.

पाण्याच्या खालीं व सभोंवतीं काळोखाचा समुद्र पसरला होता. अनंत अवकाशांत भ्रमण करणाऱ्या एखाद्या पक्ष्याप्रमाणें आमची बोट भरभर पुढें जात होती. कप्तानाच्या जीवावर शेंकडों लोक मृत्युच्या जबडयांत सुखानें झोंपले होते आणि स्वप्नामध्यें घरीं पोंचल्यानंतर

लाभणारा प्रियजनांच्या भेटीचा आनंद अनुभवीत होते. बोट कशी चालवायची याचें ज्ञान प्रवाशांपैकीं एकालाहीं नव्हते. पण सर्व लोक आपण इष्टस्थळी सुरक्षित पोंचणारच या श्रद्धेनें प्रवास करीत होते. महादेवाची गांधीजींवर अशीच श्रद्धा आहे म्हणून सर्व दुःखांना कवटाळायला तो तयार झाला आहे, त्याच्या आईची म्हाडदळच्या म्हाळसेवर निःसीम श्रद्धा आहे म्हणूनच तिनें देवीच्या प्रसादावर मुलाचें जगणें अवलंबून ठेवलें आहे, इत्यादि विचारांनी माझें मन व्यापून टाकलें. श्रद्धा जाणूनबुजून आंधळेपण पतकरते, म्हणूनच ती गांधारीप्रमाणें पुण्यवान होते. गांधारीनें जसे दुर्योधनाला वज्रदेही केलें, त्याप्रमाणें श्रद्धा चंचल मनालाही कार्यप्रवृत्त करते. बोट पणजीला पोंचेपर्यंत माझ्या मनांत श्रद्धेविषयीचेच असले अनेक विचार सुरू होते.

बोटींतून उतरतांना औपचारिक नाडी—तपासणी झाली. वैद्यानें केलेली तपासणी व ही तपासणी यांत श्रद्धा व व्यवहार यांच्याइतकें अंतर आहे असें मनांत येतें न येतें तोंच गोव्याच्या भाषेतील विशिष्ट शब्द व हेल यांच्याकडे माझें लक्ष गेलें. सोईसाठी स्पेशल मोटार करून आम्हीं तडक म्हाडदळचा मार्ग सुधारला. हुबेहुब आईसारख्या दिसणाऱ्या मुलीप्रमाणें छोटी मुंबई वाटणारी पणजी, गोमन्तकाच्या भूमीला आशीर्वाद देण्याकरतांच कीं काय खाडीच्या रूपानें डाव्या बाजूला रत्नाकरानें पसरलेला आपला हात, खाडीच्या पलीकडे वसंताची पट्टराणी शोभेल इतकी सुंदर दिसणारी वनश्री, या गोष्टी पाहत आम्हीं पुढें चाललों. चारपांच मैल गेल्यावर उजव्या हाताला एक भव्य इमारत दिसूं लागली. चौकशी करतां तें झेवियरचें चर्च आहे असें कळलें. ही भव्य इमारत ओझरती तरी पहावी असें वाटून मी व महादेव खालीं

उतरलों. आईची चर्च पाहण्याची इच्छा नव्हती. तिचें लक्ष म्हाळसेच्या प्रसादाकडे लागलें असावें! पण आम्हीं दोघांनीं आग्रह केल्यामुळें ती आमच्याबरोबर आली. एखाद्या राजवाड्यालाहि लाजविणारे भव्य दिवाण-खाने, सूर्यकिरणांनी रंगून गेलेल्या मेघांप्रमाणें दिसणारीं छतें, तारका-खचित आकाशालाहि लाजविणारे नक्षीकाम, या सर्व गोष्टी पाहून आम्हीं विस्मयचकित होऊन गेलों. आमचा ड्रायव्हर म्हणाला, "इथं देऊळ होतं पूर्वी!"

"देऊळ?" आईनें आश्चर्ययुक्त स्वरानें विचारलें.

"होय, आई! एका कोट्याधीश सावकारानं हें देऊळ बांधलं होतं म्हणे. या देवाकरतां दररोज काशीहून गंगेचं पाणी येत असे. त्या देवळाचा कळस हिऱ्यांचा होता असं सांगतात. पण बाटाबाटीच्या वेळीं जिवाच्या भीतीनं तो सावकार नी सारे पुजारी पळून गेले आणि मंदिराची मिलागर झाली!"

"मिलागर म्हणजे?"

"मिलागर म्हणजे चर्च."

ड्रायव्हर पुढें कांहींच बोलला नाहीं. आम्हीं सर्व जड पावलांनीं चर्चच्या बाहेर आलों. आई महादेवाकडे वळून म्हणाली, "हें सारं आमचं–हिंदूंचं होतं ना?" महादेवानें होकारार्थी मान हालविली. आई पदरानें डोळे पुसूं लागली. गतविभूतीप्रमाणें गतवैभवाची आठव-णहि मनुष्याचें मन उचंबळवून टाकते. तिची ती स्थिति पाहून महादेव म्हणाला "आई, एका देवळाचं चर्च झालं म्हणून तुला इतकं वाईट वाटतं. पण आज साऱ्या देशभर सोन्यासारख्या मुलांची मातीं होत आहे. रक्ताचं पाणी करावं एकानं, आणि त्या पाण्यानं मळे पिकावेत दुसऱ्याचे, अशी स्थिती चालली आहे—"

कायदेभंगाची आवश्यकता पटविणारे हे महादेवाचे बोलणे वाढूं नये म्हणून शिखराकडे बोट दाखवून मी म्हणाले, "तो पहा क्रॉस."

ड्रायव्हर म्हणाला, "हिऱ्याचा कळस जाऊन त्याच्या जागी क्रूस आला हा. इथल्या या साऱ्या मिरागरीवर क्रूस आहे. पण त्या पलीकडच्या महादेवाच्या देवळावर मात्र नाही. क्रूस टिकतच नाही त्याच्यावर!" ही विलक्षण गोष्ट ऐकून महादेवाचे देऊळ ऊर्फ चर्च पाहण्याची विलक्षण उत्कंठा आम्हांला वाटूं लागली. जवळ जाऊन पाहिले तो चर्च अगदी सामान्य! पण वर क्रॉस मात्र नाही. क्रॉस नसण्याचे कारण ड्रायव्हरला विचारतांच तो म्हणाला, "ते झेवियरचं चर्च म्हणजे मोठ्या [illegible]काराचे देऊळ होतं! हे चर्च कांही तसं नाहीं. एका [illegible]बाईला सांबाची पिंडी सांपडली, तिची तिनं इथं स्थापना केली [illegible] आपलं घरदार विकून लहानसं देऊळ बांधलं. बाटाबाटीच्या वेळी [illegible]कार आणि त्याचे नोकरचाकर आपलं देऊळ सोडून पळून गेले. पण ती बाई या महादेवाच्या देवळांतून कांही हालली नाही. महादेवाची पिंडी पाद्री लोक भ्रष्ट करतील म्हणून ती त्या पिंडीला मिठी घालून बसली. त्या दुष्टानीं तिचे तुकडे तुकडे केले, तेव्हां हें देऊळ त्यांना मिळालं. [illegible] तरी 'माझा सांब बाटूं [illegible] नाही [illegible]!' असं [illegible]."

[illegible] दंतकथा होती की सत्यकथा होती कुणाला [illegible]ण तिनें [illegible] रम्य आणि उदात्त [illegible]जगांत आम्हांला नेलें.

"स्वत:च्या [illegible]ला तिन सांबाला" अश्रुपूर्ण डोळ्यांनीं आई [illegible].

"आज इतकीं वर्षं झालीं. [illegible]चं चर्च झालं. पण त्याच्यावर क्रूस मात्र रहात नाही. आज चढवला तर उद्यां सकाळीं खाली पड-

लेला दिसतो. त्या बाईचा महादेव बाटला नाहीं हेंच खरं." ड्रायव्हर सांगत होता.

"भाव तिथं देव !" दीर्घ निःश्वास टाकून मी म्हाणालें.

महादेवाकडे पाहत सद्गदित कंठानें आई म्हणाली, "बाळ म्हाडदळला जाऊन प्रसाद लावायला नको आतां ! ईथंच महादेवानं प्रसाद दिला हा. तूं खुशाल कायदेभंग करायला जा."

आवेगानें थरथर कांपत ती खाली बसली. तिचें सांत्वन करण्याकरितां महादेव तिच्याजवळ जाऊन बसला. क्रूस नसलेलें महादेवाचें देऊळ व क्रूस डोक्यावर धारण करणारें झेवियरचें चर्च या दोन्ही इमारतींकडे मी आळीपाळीनें पाहूं लागलें. लक्षाधीश सावकाराचें देऊळ आज परधर्माच्या गुलामगिरीचा छाप कपाळीं घेऊन बसलें आहे. पण एका भिकारणीचें देऊळ तो छाप हां हां म्हणतां पुसून टाकीत आहे. महादेवाच्या देवळाकडे तोंड करून मी वंदन केलें. सांबाच्या पिंडीला कवटाळून बसलेली ती भिकारीण मला दिसूं लागली. "माझा सांब बाटूं देणार नाहीं मी" अशी गर्जना ती करीत आहे असा मला भास झाला. मी काय करीत आहें याचें भान न राहून मी त्या च[illegible]ें साष्टांग नमस्कार घातला.

१९३०

# ताईचा फोटो

श्री गजानन वसतिगृहाच्या सूचना–फलकापुढे मुलांची ही गर्दी झाली होती! महात्मा गांधींच्या आगमनप्रसंगी हात-पाय चेंगरले तरी लोक जसे आतुरतेनें पुढें जात असतात त्याप्रमाणे कुणी कोपरानें पुढच्याला लोटून, कुणी डोळे बारीक करून, तर कुणी चवड्यावर उभे राहून नोटीस–बोर्डाचें दर्शन घेत होते. शेवटी पाय चेंगरल्यामुळें त्यांतला एक ओरडून म्हणाला, "आषाढी एकादशी-दिवशीं पंढरपूरला विठोबाचं दर्शन घ्यायला देखील इतका त्रास पडत नसेल!" काल फुटबॉल खेळतांना ज्याचा हात खरचटला होता असा विद्यार्थि किंचाळला "स्वयंवर संपल्यावर थेटरांतून बाहेर पड-तांना देखील इतकें गुदमरायला होत नसेल!" या धक्काबुक्कींत कुणाला बोर्डावरील नोटीस नीट दिसत नाही असें पाहून तिसऱ्या एकानें सूचना केली, "वीरहो, बोर्डावर तुटून पडण्यांत काय मतलब आहे? बोर्डा-जवळ असलेल्यापैकीं कुणाला वाचतां येत असेल तर नोटीस वाचा अन् आमचे कान पवित्र करा!" ही सूचनेचा स्वीकार होऊन बोर्डाजवळ असलेला एक मुलगा वाचूं लागला:—

“ वसतिगृहातील विद्यार्थ्यांच्या हिताकरितां नवे दोन नियम करण्यांत येत असून ते उद्यांपासून अंमलांत येतील.

(१) सकाळी सर्वांनी दूधच प्यालें पाहिजे. कोणाला कोणत्याहि सबबीवर चहा मिळणार नाही. दुकानांत जाऊन चहा घेणारांना कडक शिक्षा होईल.

(२) दारावर भय्याचा पहारा असल्यामुळें बुधवार—शनवारच्या नाटकांना मुलांना जातां येत नाहीं; पण वसतिगृहांतील विद्यार्थी रविवारच्या नाटकांना परवानगीवांचून जातात, असे आढळून आलें आहे. बिगरपरवानगीनें नाटकाला जाणाऱ्या विद्यार्थ्यालाही कडक शिक्षा केली जाईल.

**रा. प. पटवर्धन,**

सुपरिंटेंडेंट, श्री गजानन वसतिगृह.”

हे नियम सर्व विद्यार्थ्यांच्या कानांना तापलेल्या तेलाप्रमाणें वाटले.

“ अन्याय ! अघोर अन्याय ! ” एक ओरडला. “ हिंदुस्थानला म्हणे स्वयंनिर्णय पाहिजे ! नी विद्यार्थ्यांना आपण काय प्यावं, हें ठरविण्याचा देखील हक्क नाही ! ”

“ चहा नाही तर हिंदुस्थानला स्वराज्य कसलं मिळतं डोंबलाचं ?” काळ्याला वाचा फुटली. “ मराठे व इंग्रज या पुस्तकांत मराठेशाही कशानें बुडाली याची जी कारणें दिलीं आहेत तीं सारीं खोटीं आहेत. मराठेशाही बुडण्याचं कारण एकच ! नि ते दुसरा बाजीराव, बापू गोखले, त्रिंबकराव डेंगळे, वगैरे मंडळी चहा पीत नव्हती हेंच आहे ! इंग्रजांनीं तागडीनें राज्य मिळविलं कीं [illegible], असा वेडगळ प्रश्न

विद्वान विचारतात. माझं ठाम मत असं आहे कीं, त्यांनी चहानं राज्य मिळवलं!"

"शाबास! वन्समोअर!" कांहीं विद्यार्थी ओरडले.

"या शोधावर अवश्य ग्रंथ लिही तूं. नोबेल-प्राईझ मिळेल मॅट्रिक व्हायच्या आधींच!"

"चहा नाहीं तर अभ्यास कसा व्हायचा?" दूर उभा असलेला एक मुलगा म्हणाला.

"खरंच. स्त्रीला जसा कुंकुमतिलक तसा विद्यार्थ्यांना चहा. ही वैधव्यदशा बळजबरीनं आमच्यावर लादण्याचा सुपरिंटेंडंटला काय अधिकार आहे?" वसतिगृहाचे राजकवि म्हणाले.

"चहानं प्रकृति खराब होते, असं तरी एक वेळ म्हणतां येईल. पण नाटकांनीं काय घोडं मारलं आहे असं? उलट, हाडकुळीं मुलं नाटकांत गेल्यावर लठ्ठ होतात, असा अनुभव आहे." झोंकदार भांग काढलेले गृहस्थ उद्गारले.

"शिवाय 'नाट्यं भिन्नरुचेर्जनस्य बहुधाप्येकं समाराधनम्' असं कवि कुलगुरूंचं वचनच आहे." संस्कृतस्कॉलरनीं पांडित्य केलें.

"अहो भावी जगन्नाथ शंकरशेट, तुमच्या कविकुलगुरूंना विचारतो कोण या वसतिगृहांत? इथले साहित्याचार्य, कविकुलगुरु, सरस्वतिकंठमणि, एंपरर ऑफ इंडिया, लीग ऑफ नेशन्स—सर्व कांहीं रा. प. पटवर्धन, सुपरिंटेंडंट, श्रीगजानन-वसतिगृह हे आहेत! काळे संतापानें म्हणाला.

"पटवर्धन आले वाटतं हं!"काळ्याचा सोबती सुखात्मे रस्त्याकडे पाहत म्हणाला.

"पळा तर आ[illegible] आपापल्या खोल्यांकडे."

" सकाळींच कुठें गेले होते पण हे ?"

" चहा प्यायला असतील ! "

" छट् त्या आरोग्यमंडळाची सभा असेल ! नाहीं तर इथं कुठ-लीशी नाटकमंडळी आली आहे, तिला आपलं नाटक दाखवायला गेले असतील. "

या वाक्यावर टीका सुरू होणार इतक्यांत सुपरिंटेंडेंट वसति-गृहाच्या फाटकापाशीं आलेले दिसले. बागुलबोवाला पाहून भिणाऱ्या मुलाप्रमाणें ज्यानें त्यानें धडधडणाऱ्या छातीनें आपली खोली गांठली.

  

**मो**ठेपणाचे जे अनेक तोटे आहेत त्यांतील प्रमुख लहान मुला-प्रमाणें रडून एखादी गोष्ट मिळवितां येत नाहीं हा होय. गजानन—वसतिगृहाच्या इंग्रजी शाळेंत जाणाऱ्या मुलांना हाच पेंच पडला. चहाच्या भावी वियोगानें त्यांचा कंठ दाटून येत होता. पण रडणें मात्र त्यांना शक्य नव्हतें. एकानें चहाच्या हद्दपारीबद्दल निषेधदर्शक सभा भरविण्याचा बूट काढला. उंट पोटांत खूप पाणी घेऊन सहारासारख्या निर्जल मैदानांतून ज्याप्रमाणें प्रवास करतो, त्याप्रमाणें आपणही आज यथेच्छ चहा पिऊन वसतिगृहांतील निश्चहा [ सदरहू विद्यार्थी व्याक-रणांत नेहमीं नापास होत असल्यामुळें या समासाला वाचकांनीं नांवें ठेवूं नयेत ! ] जीवन कंठावें, अशी सूचना दुसऱ्यानें पुढें आणली. तिसऱ्यानें चहाद्रोह हा राजद्रोहापेक्षांही मोठा गुन्हा असल्यामुळें सर-कारनें सुपरिंटेंडेंटना पांच वर्षें आसामांतील चहाच्या मळ्यांत पाठवावें अशा अर्थाचें पत्र वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध करण्याची युक्ति पुढें मांडली. पण दरिद्र्याप्रमाणें दुर्बलाच्याही मनोरथांची उत्पत्ति व विलय एकाच

वेळीं घडून येतात. मांजराच्या गळ्यांत घांट बांधण्याची किंबहुना एखाद्या कुत्र्याला छू: करून त्यांच्यावर सोडण्याची कल्पना पुष्कळ उंदरांना सुचत असेल! पण ती अंमलांत आणण्याचें धारिष्ट कोणालाच होत नाहीं.

संध्याकाळीं सुपरिंटेंडेंट फिरून येऊन पाहतात तों आपल्या खोलीच्या दारावर अनेक कागद चिकटविलेले असून त्याला गांवांतील रहदारीच्या गल्लीच्या कोंपऱ्याची व कोर्टांतील नोटीस–बोर्डाची कळा आलेली आहे! उजव्या दारावरील अगदीं वरचा जाड्या अक्षरांचा कागद 'चहा पिणें हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' या सुभाषितानें अलंकृत झालेला होता. त्याच्याखालीं 'हें कोण बोललें बोला! पिउं नको बाळ चाहाला' या ओळींचा कागद असून 'भवभूतीच्या उत्तररामाप्रमाणें गोविंदाग्रजांची ही कविता दगडांना देखील पाझर फोडील असें टीकाकार ह्मणतात; पाहूं या आमच्या सुपरिंटेंडेंटना फुटतो कीं काय तें!' या गद्याची त्यांना जोड देण्यांत आली होती त्याच्या खालच्या कागदावर केशवसुतांच्या 'तुतारीं'तील पाहिल्या कडव्याचें विडंबन करून खालील ओळी लिहिल्या होत्या:—

"एक चहा–कप द्या मज आणुनि
पिईन मी जो स्वप्राणानें
पाहिन नाटक भेदुनि गगनें
दीर्घ ज्याचिया त्या घुटक्यानें
असा चहा–कप द्या मज आणुनि!"

डावें दारहि असेंच निरनिराळ्या लेखांनीं नटलें होतें. वरच्याच कागदावर **नव्या स्वारी** हे शब्द तांबड्या शाईत काढले होते. या शब्दाखालीं [१] सुपरिंटेंडेंटनीं चहा बंद केला म्हणून गांवांतलीं चहाचीं

दुकानें बंद होत नाहींत. [२] राजा करील ती पूर्वदिशा, भट करील ती अमावास्या आणि सुपरिंटेंडेंट करील तो नियम वगैरे नवे वाक्प्रचार लिहिले होते. ह्या कागदाखालच्या कागदावर तर फारच बहारीचा मजकूर होता.

खून, भयंकर खून !
केव्हां ? उद्यां.
कुठें ? गजानन वसतिगृहांत.
कुणाकडून ? सुपरिंटेंडेंटकडून.
कुणाचा ? सर्व मुलांचा.
कशानें ? चहा न देण्यानें.

पटवर्धनांना हें सर्व लिखाण वाचून रागापेक्षां हंसूंच आलें. मुलांच्या सूडाची मर्यादा सहसा कागदापलीकडे जात नाहीं, हें त्यांना पक्कें माहीत होतें. मुलांचा राग म्हणजे गारांचा पाऊस. अंगाला गारा थोड्याशा झोंबल्या तरी त्या जशा पटापट वेंचून खातां येतात, त्याप्रमाणें बालकांच्या रागांत थोडसें तिखटमीठ असलें तरी बहुतेक भाग हास्यविनोदाच्या मध–साखरेनेंच भरलेला असतो. या लिखाणाला एखाद्या राजद्रोही लेखाचें स्वरूप देऊन वसतिगृहांतील सर्व विद्यार्थ्यांची झडती घेण्याचा विचार पटवर्धनांच्या मनाला शिवलादेखील नाहीं. त्यांतलें शेवटचें अक्षर सुखात्मे नांवाच्या एका नव्या व हुषार विद्यार्थ्याचें असावें, असा संशय आल्यावरून त्याला मात्र त्यांनीं बोलावून आणलें. सुखात्म्याच्या पोटांत शिरण्याचा त्यांनी पुष्कळ प्रयत्न केला; पण त्यानें चक्क कानांवर हात ठेवले. ' ताईच्या फोटोला स्मरून मी सांगतों, मला यातलं कांहीं ठाऊक नाहीं ! " तो शेवटीं म्हणाला. ताईच्या फोटोवर त्याची किती भक्ति आहे हें माहीत असल्यामुळें

त्याच्या शेवटच्या वाक्यानें पटवर्धनांचें समाधान झालें.

सुखात्मे खोलींत परत आल्यावर तो व त्याचा सोबती काळे यांचें संभाषण सुरू झालें.

काळेः—काय सुखात्मे? काय म्हणतात सुपरिंटेंडेंट? धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे किमकुर्वत संजय?

सुखात्मेः—चोर सोडून संन्याशाला सुळीं द्यायला लागले! म्हणे त्यांच्या दरवाजावर चिकटवलेल्या एका कागदांतील अक्षर माझ्या अक्षरासारखं आहे. मी जर तें लिहिलें असतें तर मुद्दाम निराळं अक्षर नसतं का काढलं? शेवटीं ताईच्या फोटोची शपथ घेतली तेव्हां सुटका झाली.

काळेः—ते कागद कोणी लिहोत, उद्यांच्या चहाचं काय करायचं? चहाची संवय एकदम थोडीच सुटते! थेंबें थेंबें तळें आटे, हें या एम्. ए. झालेल्या रा. प. ला माहीत नाहीं!

सुखात्मेः—तुझं ब्रम्हज्ञान सुपरिंटेंडेंट थोडंच ऐकायला बसले आहेत!

काळेः—पुढचं पुढं. पण उद्यां तरी चहा प्यायला मिळालाच पाहिजे. येनकेन प्रकारेण चहापानम्—जाऊं द्या साधत नाहीं तर! उद्यां शनिवार. तेव्हां सकाळचीच शाळा आहे. सुटतांच गांठूं या फक्कडसं दुकान म्हणजे झालं. विचारलंच सुपरिंटेंडेंटनीं तर रस्त्यावर एक चुकलेलं लहान मूल आढळलं, त्याला त्याच्या घरीं पोंचतं करून आलों म्हणून सांगूं. हो, जे का रंजले गांजले—

सुखात्मेः—हें लहान मूल म्हणजे तूं, आणि त्याचं घर म्हणजे चहाचं दुकान, असंच ना? चहाच्या विरहानं मी तुझ्यासारखा वेडा होणार नाहीं. माझ्या ताईनं मला चहाची संवय कधीं लागूंच दिली नाहीं.

हें बोलत असतांनाच टेबलावरील फोटोकडे त्यानें कृतज्ञतेनें पाहिलें. सोनेरी चौकटींत बसविलेला सुमारें पंचवीस वर्षांच्या एका विधवा तरुणीचा तो फोटो होता. त्या फोटोकडे पाहतांच सुखात्म्याला कसलीशी आठवण झाली व तो पश्चातप्त मुद्रेनें म्हणाला, " आजच्या या नोटिसांच्या गोंधळांत मी ताईच्या फोटोची पूजा करायला विसरलोंच कीं!" तो टेबलाकडे गेला व सद्गदित कंठानें म्हणाला, " ताई, चुकलों मी. मला क्षमा करशील ना? तुझ्यावांचून मला कोण क्षमा करणार?" त्याचें मन आवेगानें इतकें क्षुब्ध झालें होतें कीं, त्यानें फोटोंतील त्या मूर्तीला साष्टांग नमस्कार घातला. नमस्कार घातल्यानंतर त्याचें मन थोडेसें शांत झालें. तो काळ्याकडे वळून म्हणाला, " काळे, तूं मला वेडा म्हणशील. पण ताईची आठवण झाली कीं माझ्या पोटांत कसं कालवून येतं रे! आज ताई असती तर बाबांनी माईचं ऐकून मला बोर्डिंगांत कशाला पाठविलं असतं?"

चहाच्या पेल्यांतील वादळ आपोआप शांत होतें हें काळ्याला माहित होतें; पण प्रियजनाच्या स्मरणानें उत्पन्न होणारें अंतःकरणांतील वादळ कसें शांत करायचें, हें त्याला कळेना. तो सुखात्म्याच्या जवळ येऊन त्याच्या पाठीवरून हात फिरवून म्हणाला, " असं काय बरं! तुझ्या ताईवर तूं किती प्रेम करतोस, हें काय आम्हाला कळत नाहीं? तिचा फोटो कसा सुंदर सोनेरी चौकटींत तूं बसविला आहेस!"

" खरी सोनेरी चौकट नाहीं ती! दिसते मात्र सोन्याची! ताईची एवढीच काय ती माझ्यापाशीं आठवण! पण सोन्याची चौकट करण्याइतका पैसा मला कोण रे देतो? शेवटीं परटाकडे द्यायचे कपडे स्वतःच नदीवर धुवून त्याचे माईकडून मिळणारे पैसे सांठविले नि सोनेरी मुलाम्याची ही चौकट केली."

"दिसते अगदीं सोन्यासारखी पण—"

"माझी ताईदेखील सोन्यासारखी होती."

"झालं तुझं ताईपुराण सुरू. सारं बोर्डिंग थट्टा करतं तुझ्या ताईच्या फोटोची नि त्याच्या पूजेची! पण तुझं कांहीं वेड जात नाहीं अजून!"

"सूर्याभोंवती नाचण्याचं पृथ्वीचं वेड इतरांच्या उपदेशानं कमी होत नाहीं, हें कविवचन ऐकलं आहेस का कधी?"

"परिक्षेंत आम्हांला नापास करणाऱ्या या अवघड कवींचा मला असा राग येतो कीं बोलून सोय नाहीं! मोरोपंत जर आज जिवंत असता तर फांशीं गेलों असतों तरी बेहत्तर! पण त्याचा हात कलम करून टाकला असता आधीं! तुझ्यासारखा एक फोटो घेऊन त्याची पूजा करीत बसलों नसतों!"

"ताईनं माझ्यासाठीं काय काय केलं आहे, हें तुला माहित नाहीं रे काळे! माझ्या पोटांत कसलासा रोग झाला होता नि ऑपरेशन करायला हवं होतं. माई पैशाची सबब पुढं काढून बाबांना चालढकल करायला लावीत होती. त्या वेळीं ताईनं आपले सगळे दागिने विकून माझं ऑपरेशन करविलं बघ. मी विषमानं आजारी असतांना तर मला झोंप लागली आहे, असं वाटून ती दत्ताच्या फोटोपुढं जाऊन बसली नि 'देवा, माझं सारं आयुष्य माझ्या भाऊरायाला दे' असं म्हणून ओक्साबोक्सी रडूं लागली. ते शब्द आठवले कीं कसं भडभडून येतं!"

सुखात्म्याच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. थोडा वेळ गप्प बसून काळे म्हणाला, "आंसवांनीं कांहीं चहाची तलफ भागायची नाहीं. चहा पिण्याचा वार शनिवार, असं उद्यां करायचं ना?"

" माझ्या खिशांत एक फुटकी कवडी देखील नाही! मी पैसे उधळीन म्हणून माईंनी माझ्याकडे एक पैदेखील देऊं नका, असं बाबांना सांगितलं आहे. माझ्या खर्चाचे पैसे परस्पर सुपरिंटेंडंटांकडे येतात, हें काय ठाऊक नाही तुला?"

" पैशाची नको रे तुला काळजी! पिशील तेवढा चहा पाजीन! अगदी आकंठ. मग तर झालं ना? तुझ्यासारखा हुषार मुलगा माझ्या-बरोबर असला म्हणजे मी चहा प्यायला गेलों होतों, असं सुपरिंटेंडेंटच्या स्वप्नांत देखील येणार नाही."

" दुसऱ्या एका बाबतीत मला मदत करशील तर तुझ्या बंडांत मी सामील होईन."

" सांग ना तुला कसली मदत हवी ती."

" इथं नाटक कंपनी आली आहे कीं नाही, तिच्यांत एक आमच्या गांवचा मुलगा आहे. मराठी शाळेंत आम्ही अगदीं जीवश्च कंठश्च होतों म्हणेनास. रविवारी इतर मुलं नाटकाला जातात, हें पाहून त्याचा आग्रह मला मोडवेना—कालच येत्या रविवारीं मी येतों, असं त्याला सांगितलंय्. पण आतां तर नाटकबंदीची नोटीस लागली. रविवारीं सहाच्या नंतर सुपरिंटेंडेंट आम्हांला बाहेर राहूं देणार नाहींत."

" अरे, नाटक पाहण्याचा वार शनिवार! रविवारलाच काय सोनं लागलंय्?"

"पण शनिवारीं रात्रीं नाटक असतं बाबा! दारावरल्या भय्याच्या हातावर तुरी कशा देणार? खिडकीतून जावं म्हटलं तर आपली खोलीहि कांहीं तळमजल्यावर नाहीं. या पहिल्या मजल्यावरून उडी टाकली तर थेटरांतलं नाटक बघायला न मिळतां इकडे मात्र सवाई माधवरावाचा मृत्यु' व्हायचा!"

"खिडकीचा वाममार्ग हवा कशाला आपणांला? भय्याच्या हातावर चांगलीशी अफूची गोळी घातली कीं काम फत्ते झालंच बघ. त्याला महिनाभर पुरेल एवढी अफू देतों उद्यां आणून. जाऊं देत माझे पैसे. मग तर झालं? बस्स, ठरलं. चहा पिण्याच्या बाबतींत तूं मला मदत करायचीस नि नाटकाला जाण्याच्या बाबतींत मी तुला करायची. हें घे वचन."

  

मेघदूतांतील यक्षाप्रमाणें काळे वर्गांत पळ—पळ मोजीत बसला होता. यक्षाला जशीं अलकेचीं त्याप्रमाणें त्याला चहाच्या दुकानाची नानाविध रम्य चित्रें दिसत होतीं. मराठीच्या तासाला मास्तरनीं प्रश्न विचारल्याबरोबर झोंपेंतून जागा झाल्याप्रमाणें चेहरा करून तो ह्मणाला "आय् पार्डन् यू सर!"

"बेवकूफ! आय पार्डन यू काय? गद्धा! 'लोक आपल्याला चाहतील असं वागलं पाहिजे' या वाक्यांतील चाहतील याचा अर्थ काय?" काळ्यानें बरेंच डोकें खाजविलें; पण चहावांचून तें चालायला तयार नव्हतें. मास्तर खेंकसून म्हणाले, "एवढा साधा शब्द कळत नाहीं तुला? नुसते बटाटेच भरले आहेत वाटतं डोक्यांत? चाहतील म्हणजे बरे म्हणतील. लोक आपल्याला चाहतील म्हणजे लोकांना आपण आवडूं. समजला का शब्द?"

झोंपेंत बोलणाऱ्या माणसाप्रमाणें काळे म्हणाला, "होय सर. चाहणें म्हणजे आवडणें. चहा जसा लोकांना आवडतो तसं आवडणं" वर्गांत एकच हंशा पिकला. पण चहाच्या वियोगानें करुणरसाची

मूर्ति बनलेल्या काळ्याचे ओंठ एकमेकापासून किंचित् देखील अलग झाले नाहींत.

मराठीचे मास्तर जाऊन इतिहासाचे मास्तर आले. पण काळ्याची चहासमाधि अमेरिकन युद्धांतल्या तोफांनीं देखील भंग पावली नाहीं. त्याचें वर्गांत लक्ष नाहींसें पाहून मास्तरांनीं एकदां विचारलें, "काय रे काळे, अमेरिकन लोकांनीं इंग्लंडहून आणलेल्या चहाच्या पेट्या समुद्रांत कां फेंकल्या?"

'ते मूर्ख होते म्हणून' हें उत्तर काळ्याच्या जिभेच्या शेंड्यावर आलें; पण जिभेचें प्रायश्चित हाताला भोगावें लागणार, असा विचार करून त्यानें मनोनिग्रह केला. मनांत मात्र त्यानें अमेरिकन लोकांना शिव्यांची लाखोली वाहिली. इतिहासाचा तास संपतांच तो सुखात्म्याला म्हणाला, "फुकट नाहीं इंग्रजांना हिंदुस्थान मिळालं! अमेरिकनासारखा पाण्यांत चहा नाहीं त्यांनीं घातला कधीं!"

तीन युगांप्रमाणें वाटणारे तीन तास संपून एकदांची घंटा झाली. पण घण घण वाजणाऱ्या त्या घंटेचा आवाज आज काळ्याला सारंगीपेक्षांहि मधुर वाटला. मंत्रानें बद्ध झालेल्या सर्पाप्रमाणें तो आतांपर्यंत चुळबुळ करीत होता! शाळेबाहेर येतांच सुखात्म्याचीं पावलें वसतिगृहाच्या वाटेकडे वळलेलीं पाहतांच तो म्हणाला,

"विसरलास वाटतं वेड्या? तिकडे चहादेव आपली वाट पाहत बसले आहेत ना?"

"नको बोवा तो चहा. चुकून सुपरिंटेंडेंटनां कळलं तर कांट्याचा नायटा व्हायचा!"

"त्या नायट्यावर माझ्यापाशीं आहे रामबाण औषध. अन् सुपरिंटेंडेंट म्हणजे काय दुकानांतील कपबशा विसळणारा पोऱ्या आहे,

कीं त्यांना आपण चहा प्यालेला कळून येईल? कांदा—लसूण चोरून खाल्लीं तर लपवितां यायचीं नाहींत; पण चहाचं तसं नाहीं. त्याचं गुपित आपल्या पोटांत!"

सुखात्मे कांहींच बोलत नाहींसें पाहून काळे पुन्हां म्हणाला, "माझ्या चहावर तुझं नाटक अवलंबून आहे, हें मात्र विसरूं नकोस हं!"

बाळमित्राला दिलेल्या वचनाची आठवण होतांच सुखात्म्याचें मन व त्याबरोबरच तोंड फिरलें आणि तो काळ्याबरोबर वाहूं लागला. प्रथम कंपनींत जाऊन आज रात्रीं आपण दोघे नाटकाला येतों, असें त्यानें आपल्या दोस्ताला सांगितलें. "पहिल्या अंकाच्या दुसऱ्याच प्रवेशांत माझं काम आहे; तेव्हां लवकरच ये हं!" नटमित्रांनीं खास सूचना दिली. फार पुढच्या खुर्च्या आपल्याला नकोत असें सुखात्म्यानें बजावल्यामुळें शेवटच्या रांगेच्या अलिकडच्या रांगेतील मध्यवर्ती खुर्च्या मुक्रर करण्यांत आल्या. कंपनींतील काम आटोपल्यावर काळे 'अफू, भांग, गांजा, चरस' वगैरे पदव्यांनीं भूषित झालेल्या पाट्या धुंडाळूं लागला. पहिल्या दुकानदारानें तर "अफू कशाला रे पाहिजे बाबा तुला? नापास झालास म्हणून जीवबिव द्यायचा आहे कीं काय?" असाच काळ्याला प्रश्न केला. पण पैशाच्या खणखण आवाजापुढें फालतू प्रश्नांची टुरटुर चालत नसल्यामुळें दोनतीन दुकानांत मिळून भय्याजी खुष होतील, इतका अफूचा नजराणा काळेमहाशयानीं संपादन केला. अफू खिशांत पडतांच तो सुखात्म्याला म्हणाला, "जरा लांबच्याच दुकानांत जाऊन चहा घेऊं या. उशीर झाला तर चुकलेल्या मुलाची गोष्ट आहेच आपल्यापाशीं. फार झालं तर तो मोटारखालीं सांपडला होता असं सांगूं!" दोन तीन बोळ मागें

टाकून ते एका आड बाजूच्या 'क्षुधाशांतिमंदिरापाशीं आले. मंदिराची बाहेरची बाजू आज बरीच स्वच्छ दिसत होती. "आपण येणार म्हणूनच ही स्वच्छता दिसते हं सुखात्मे!" काळे रंगांत येऊन म्हणाला. "पण आज इथं बाहेरच्या बाजूला बसतां उपयोगी नाहीं. हो, आपली वेळ वाईट आहे. सहज कुणी रस्त्यावरून जातांना पाहिलं तर!" ते आंतल्या भागांत गेले. बाहेरचा भाग ब्रिटिश मुलखांतल्या कारभारासारखा दिसत होता; पण आंतला भाग मात्र कुत्रीं, घोडीं व मोटारी यांत दंग होऊन जाणाऱ्या संस्थानिकाची आठवण करून देत होता. तिथला सारा उकिरडा पाहून सुखात्म्याला शिसारीच आली. पण शिसारी येऊन करतो काय बिचारा? चक्रव्यूहांत सांपडल्यावर सिंहाच्या छाव्याला देखील बाहेर येतां येत नाहीं.

काळ्यानें भजीं, चिवडा व चहा या त्रिवेणीसंगमांत पावन व्हावयाचें ठरवून 'ए छोकरा' अशी हाक मारली. दिवे पुसण्याच्या फडक्याप्रमाणें दिसणारा सदरा घातलेला एक छोकरा आंत आला. व त्यानें काळेसाहेबांचा हुकूम ऐकला. तो जिन्नस आणावयास जातांच काळे सुखात्म्याला म्हणाला, "हें बघ सुखात्मे, आतां पुढल्या काळजीनं चालू घटकेची मजा घालवूं नकोस. बाबा, एक दिन जाना रे भाई! थोडा चहा पी, म्हणजे तुझा काळवंडलेला चेहरा तजेलेदार होईल. तुला कुणी बघेल बिघेल असं वाटत असेल तर आपण दरवाजाकडे पाठ फिरवून बसूं या! बस्स. दृष्टिआड सृष्टि!"

सुखात्मे नको नको म्हणत असतां काळ्यानें खुर्च्यांच्या पाठी दाराकडे केल्या. इतक्यांत चहा दाखल झाला व फार दिवसांनीं भेटलेल्या मुलांना चटकन् उचलून घेणाऱ्या मातेप्रमाणें काळ्यानें कपाचा कान मोठ्या प्रेमानें धरून त्याला उचललें. सुखात्मेहि आलेल्या

भोगाला सादर झाल्या. पांच मिनिटें दोघांहि मित्रांची चहानंदीं टाळी लागली होती. या समाधीचा भंग दुकानाच्या बाहेरच्या भागांत चाललेल्या बोलण्यानें झाला. दुकानाचा मालक अदबीनें कुणाला कांहीं-तरी सांगत होता. आपणाला काय करायचें आहे त्या बोलण्याशीं, असें मनांत आणून 'ए बॉय! आणखी दोन कप चहा' अशी काळ्यानें तोंड न फिरवितां ऑर्डर दिली. त्याच्या 'चहा' शब्दामधील 'आ'कार हवेंत लोप पावतो न पावतो तोंच दारांत कुणाचीशीं पावलें वाजलीं. छोकरा आला असेल म्हणून काळ्यानें वळून देखील पाहिलें नाहीं. "चहा, दोन कप चहा!" नाटकांतील राजाला शोभेल अशा स्वरांत तो ओरडला. पण 'हो साहेब' या उत्तराऐवजी "किती घाणेरडा भाग आहे हा आंतला! आरोग्यमंडळाकडे याविषयीं कडक रिपोर्ट लिहिल्यावांचून राहणार नाहीं मी!" हे शब्द त्याच्या कानांवर पडले. आवाज ओळखीचा वाटल्यामुळें काळे व सुखात्मे या दोघांनींहि मागें वळून पाहिलें. तों दारांत दुकानाच्या मालकाबरोबर सुपरिंटेंडेंट्-साहेब उभे! काळ्याच्या घशांतील भजें तिथेंच अडकून त्याला ठसका लागला व सुखात्मे तर भूत दिसावें त्याप्रमाणें दचकून उठल्यामुळें टेबलावरील पेल्याला त्याचा धक्का लागून तो खळकन् जमिनीवर पडला.

  

**आ**पण मुद्दाम आडगल्लींतील चहाचें दुकान शोधून काढावें व सुपरिंटेंडेंटनीं ऐनवेळीं तेथें येऊन रंगाचा भंग करावा, या दैवदुर्विलसिताचें काळ्याला आश्चर्य वाटूं लागलें. आरोग्यमंडळासारखे नसते उपद्व्याप या जगांत निर्माण झाल्यामुळेंच चहा पीत असतांना पकडलें जाण्याचा

प्रसंग आपल्यावर आला, असाहि विचार त्याच्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं. पटवर्धनांचें लक्ष दुकानांतील घाणीवरून उडून या दोन मुलांकडे लागलें, हें बघून दुकानाच्या मालकालाहि हायसें वाटलें. दुकान म्हणजे चव्हाटा हें ध्यानांत आणून अधिक उणा एक शब्दहि न बोलतां पटवर्धनांनीं काळे व सुखात्मे यांना आपल्याबरोबर येण्याविषयीं सांगितलें. प्यालेल्या चहाच्या पैशांत फुटलेल्या पेल्याच्या किंमतीची भर पडलेली पाहून काळ्याला फार वाईट वाटलें. आपल्या फुटक्या नशिबाला दोष देत त्यानें पैसे दुकानदाराच्या हातावर ठेवले व तो सुखात्म्यासह मुकाट्यानें पटवर्धनांच्या मागून चालूं लागला.

खोलींत गेल्यावर काळ्यानें दार लोटलें नाहीं तोंच सुखात्म्याला रडूं कोसळलें. "असं काय रे पोरासारखं करतोस? आलिया भोगासी असावें सादर, असंच तुकोबा म्हणतात ना?" काळे म्हणाला.

सुखात्मे:—छडीनं हात रक्तबंबाळ होईल म्हणून मी भीत नाहीं; पण माझ्या घरीं हें जर कळलं तर माईच्या हातांत आयतंच कोलीत सांपडेल!

काळे:—क्लैब्यं मा स्म गमः पार्थ! अरे, भर्तृहरीनं काय म्हटलं आहे? सुधां विना न प्रययुर्विरामम्! आज बोर्डिंगांतील कविहि 'चहांविना न प्रययुर्विरामम्' असंच आपलं वर्णन करतील.

सुखात्मे:—मार खायच्या वेळी कांहीं पुढं येणार नाहींत हे कवि!

काळे:—मग काय करावं म्हणतोस?

सुखात्मे:—तुझ्या खिशांत अफू आहे ती खाऊन जीव द्यावा, असं मला वाटूं लागलं आहे!

काळे कांहींतरी उत्तर देणार, इतक्यांत कुणीसें दार खडखडावलें. धडधडणाऱ्या छातीनें दोघेहि म्हणाले "यस्, कम् इन प्लीज!"

दार उघडलें व सुपरिंटेंडेंट आंत आले. मरणोत्तर पापी जीवांना देवा-पुढें उभें राहतांना काय यातना होत असतील, याची सुखात्म्याला आतां पूर्ण कल्पना आली. काळ्याचा स्वभाव त्याच्यापेक्षां थोडासा बेफिकीर असल्यामुळें अगदीं खालीं मान घालून उभें न राहतां तो खिडकींतून दिसणाऱ्या झाडांच्या पानाकडे पाहूं लागला. खोलींत स्मशानांतील शांतता पसरली होती. पटवर्धनांनीं तिला शोभेलसा रुद्रावतार धारण केला. खुनाच्या खटल्याचा निकाल देणाऱ्या न्याया-धीशाच्या गंभीरपणानें पटवर्धन म्हणाले, "सुखात्मे, तुझ्या संगतीनं हा काळे सुधारेल म्हणून तुम्हां दोघांना एकत्र ठेवलं. पण चिखल व पाणी मिसळलं, तर चिखल पांढरा शुभ्र न होतां पाणीच गढूळ होतं, हा नेहमींचा अनुभव तूं आणून दिलास. तुम्हांला दंड करणं म्हणजे मुलांच्या अपराधाकरितां बापाला दंड करण्यासारखं आहे. पांच दहा छड्या मारल्या तर हा काळे 'आणखी पांच दहा छड्या मारा, म्हणजे आणखी एक पेला पिऊन यायला हरकत नाही' असं उत्तर द्यायलाहि कमी करणार नाहीं. म्हणून आजच्या गुन्ह्याबद्दल निराळीच शिक्षा देणार आहें तुम्हांला मी!" सुखात्मे व काळे पटवर्धनांच्या तोंडाकडे टकमका पाहूं लागले. सुपरिंटेंडेंट खिडकींतून आपला कडेलोट करणार कीं आपणांला दारावरल्या भय्याच्या पायीं देणार, हेंच त्यांना कळेना. पटवर्धनांनीं एक मोठें कुलूप काढलें व तें दोघांना दाखवीत ते म्हणाले, "आतांपासून सोमवार दुपारपर्यंत तुम्हांला बोर्डिंगांत कैद्याप्रमाणं राहिलं पाहिजे. जेवण, चहा, आंघोळ वगैरे सर्व गोष्टी शिपायाच्या देखरेखीखालीं होतील. दाराला हें कुलूप ठेवतों ठोकून! म्हणजे इतरांना नियम मोडल्याचं प्रायश्चित्त काय भोगावं लागतं, तें कळून येईल. दर वेळेला मी येऊन कुलूप उघडीन, तेव्हांच

तुम्हांला बाहेर यायला मिळेल."

काळे व सुखात्मे "पण सर–सर" असें म्हणतात तों पटवर्धन पाठ फिरवून खोलींतून चालतेहि झाले होते. दाराचा कोयंडा वाजला; बोल्ट सरकविलेला ऐकूं आला; किल्ली करून कुलूप लागलें आहे कीं नाहीं हें ओढून पाहिल्याचा आवाज व कुलूप दारावर आपटल्यामुळें झालेला आवाज हेहि पाठोपाठ कानांवर पडले—

क्षणभर काळे स्वस्थ बसला होता. सुखात्म्याची दीनवाणी मुद्रा पाहून त्याला तशा परिस्थितींतहि हंसूं आल्यावांचून राहिलें नाहीं.

"यापुढं मला लोकमान्य काळे म्हणून हांक मारायची बरं सुखात्मे! तूंहि देशभक्त झालासच कीं रे! पटवर्धनांच्या या नोकरशाहीमुळं आपली लोकप्रियता वाढणार खास!"

"आग लागो त्या लोकप्रियतेला! निसर्गाच्या हुकमाची अंमलबजावणी करतांना ही लोकप्रियता कांहीं उपयोगी पडायची नाहीं आमच्या!"

"खरंच! आम्हांला कैदी बनविलं तर तशी व्यवस्था तरी करायची कीं नाहीं? लघवीकरितां कैद्यांना मातीचीं भांडीं द्यावीं लागतात, हें कांहीं सुपरिंटेंडंटना माहीत नसावं."

"तुझी थट्टा राहूं दे बाजूला आतां."

"मग नाटकाला कसं जावं याचा विचार करावा म्हणतोस?"

"चहाच्या पायीं कैदी झालों! नाटकाला गेलों तर फांशीच जावं लागेल!"

"भित्री भागूबाई आहेस झालं तूं सुखात्मे! अरे, हिंमत मर्दा तो मदत खुदा."

"पा[illegible]ां खुदा नाटकाला कसा जाऊं देतो तें!"

"बघशील. अरे, ज्या खुदानं जनाबाईकरतां जात्यावर दळलं, ज्या खुदानं दामाजीकरतां महाराचं रूप धारण केलं—"

"तो खुदा विमानाच्या रूपानं खिडकींत येऊन उभा राहणार आहे वाटतं? तोंड आहे म्हणून बोलतोस झालं!"

"नाटक बघून आल्यावर हात आहेत म्हणून करतोस अशी शाबासकी तुझ्याकडून घेतल्यावांचून राहणार नाहीं हा पठ्या!"

"नाटकाला येतो म्हणून सांगण्याची दुर्बुद्धि मला झाली नसती तर फार बरं झालं असतं! तो आतां रात्रीं आमची वाट पाहील. दुसऱ्याच प्रवेशांत त्याचं काम आहे. त्या वेळीं मुद्दाम आमच्या खुर्च्यांकडे पाहील नि त्या रिकाम्या दिसल्या—"

"त्या रिकाम्या दिसायला हें डोकं कांहीं रिकामं आहे कीं काय?" काळे अभिमानानें आपल्या डोक्यावर आंगठ्याजवळचें बोट आपटीत म्हणाला "अरे सुखात्मे, तुम्ही हुषार मुलांनीं इतिहासांतल्या शूर पुरुषांचीं चरित्रं घोकून वरचे नंबर तेवढे मिळवावेत! पण त्यांच्या अंगांतील पाणी आम्हां नापास होणारांच्याच अंगीं आढळतं. सध्याचं शिक्षण व्यवहारदृष्ट्या निरुपयोगी आहे, असं म्हणतात तें एवढ्याचकरितां बरं बाबा!"

"नाटकाकरितां आणलेली ती अफू आतां फुकट जाणारच कीं नाहीं? खोलीलाच कुलूप बसल्यावर भय्याची मनधरणी कशी करणार?"

"अरे, अफू घेतली होती गनिमी काव्यानं लढण्याकरितां! तो डाव फसला म्हणून आम्ही शूर मराठे हार खाणार आहोंत कीं काय? असे हातपाय गाळतोस काय, सुखात्मे? तूं शिवाजीच्या महाराष्ट्रांत जन्मला आहेस, तूं काळ्याच्या महाराष्ट्रांत जन्मला आहेस, तूं बाजी-रावाच्या महाराष्ट्रांत जन्मला आहेस— "

" पहिल्या कीं दुसऱ्या ? "

" मूर्ख आहेस झालं ! आणि मूर्ख आहेस म्हणूनच शूर नाहींस. तूं अटकेवर आपला झेंडा रोवणाऱ्या राघो भरारीच्या महाराष्ट्रांत जन्मला आहेस— "

" नि गजानन–वसतिगृहांतील एका कुलूप ठोकलेल्या खोलींत बसला आहेस !"

" नुसता रडतराऊत आहेस. फुकट, फुकट तूं राणा प्रताप, डी व्हॅलेरा आणि मॅकस्विनी यांचीं चरित्रं वाचलीस ! "

" मघांपासून मी तीन चार वेळां माझ्या टेबलावरील ताईच्या फोटोकडे पाहिलं नि ती रागानं माझ्याकडं पाहत आहे, असं मला वाटलं. आजचं माझं वागणं आवडलं नाहींसं दिसतं ताईला ! "

" काय म्हणे, फोटो रागावतो ! मग उद्यां फोनोग्राफ देखील सुपरिंटेंडेंटाप्रमाणं भलभलते हुकूम सोडायला लागेल कीं ! "

काळ्याच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष न देतां सुखात्म्यानें ताईच्या फोटोला नमस्कार केला. " ताई, तुझ्या या चुकलेल्या भावाला क्षमा कर. " तो मनांतल्या मनांत म्हणाला. त्याचे डोळे या वेळीं भरून आले होते. काळे मात्र खिडकीपाशीं जाऊन समोरील झाड, खिडकीची उंची वगैरे गोष्टींचें सेनापतीच्या दृष्टीनें निरीक्षण करीत होता.

  

**का**ळे व सुखात्मे यांना आजच्यासारखा एकांत कोणत्याहि शनिवारीं मिळाला नव्हता. हातावर पाणी पडल्याबरोबर त्यांना खोलींत पोंचविण्यांत आलें व सुपरिंटेंडंट कुलपाचा बंदोबस्त करून निघून गेले.

ही मानहानिकारक शिक्षा सुखात्म्याच्या मनाला फार लागली. तो काळ्याला म्हणाला, " काय रे काळे. आपण पटवर्धनांची क्षमा मागणं बरं नाहीं का?"

" स्वराज्याप्रमाणं क्षमा मागून मिळत नसते बरं, सुखात्मे! तूं साऱ्या मुलखांतला मवाळ आहेस."

" तुझं जहाल राजकारण काढ ना कुठं आहे तें!"

" हें बघ." म्हणून काळ्यानें वळकटी गुंडाळण्याची काढणी सुखात्म्यापुढें फेंकली.

" काढणी बोलती झाल्याखेरीज मला नाही कळणार तुझं हें राजकारण!"

" बोलतीच काय, पण चालती देखील होईल! जरा दम खा हं बाळ. प्रयत्नें दोऱ्यांचे कर धरुनियां नाटक पहा!" काळ्याच्या या शीघ्रकवित्वाचें तशा मन:स्थितीतहि सुखात्म्याला हंसूं आलें.

दोन प्रहराप्रमाणें रात्रींही कैदी–विद्यार्थि जेवण होतांच खोलींत कोंडण्यांत आले.

" कळलं काय काळे" पटवर्धन दार ओढून घेतां घेतां म्हणाले. " दुपारीं चहाचा नियम मोडला आहेस; रात्रीं नाटकाचा मोडूं नकोस म्हणजे झालं!" त्यांच्या चेहऱ्यावरील स्मित काळ्याच्या हृदयांत भाल्याच्या टोंकाप्रमाणें रुतलें. दाराला कुलुप पडतांच तो म्हणाला, " सुखात्मे, आज नाटक पाहीन तरच काळ्यांच्या घराण्यांत जन्माला आल्याचं सार्थक!"

" वा रे बहाद्दर. मला वाटलं मिशी उतरण्याची प्रतिज्ञा करणार तूं!"

" असं थट्टेवारी नेऊं नकोस. सगळ्या काढण्या एकत्र बांधून

किती खंबीर दोर करून ठेवलाय् तो तर बघ! तुझ्यासारखा गुडघ्यांत मान घालून मुळु मुळु रडत बसलों नाहीं मी दिवसभर!"

काळ्यानें तो दोर काढून खिडकीच्या गजाला घट्ट बांधला. "चला सुखात्मे आतां! कोंडाण्यावर चढल्यामुळं तानाजी अमर झाला. बोर्डिंगांतून खालीं उतरल्याबद्दल तुम्ही व्हा."

सुखात्मे कांकूं करूं लागला. पण नाटककंपनींतल्या दोस्ताला 'येतों' म्हणून दिलेल्या वचनाचें काळ्यानें स्मरण करून देतांच तो दोरावरून उतरायला तयार झाला. बाहेरून जाणाऱ्या इसमाला खोलींत कुणी नाहीं असा संशय येऊं नये, म्हणून दिवा बारीक करून ठेवण्यांत आला. सुखात्म्याला उतरण्याचा धीर व्हावा म्हणून काळ्यानें पुढाकार घेण्याचें ठरविलें. खुंटीला टांगलेली थर्मास्‌ची बाटली त्यानें खांकेला लटकाविली व तो खिडकीपाशीं जाऊन पवित्र्यांत उभा राहिला.

"थर्मास् कशाला रे घेतोस?"

"वेडा रे वेडा! नाटकाच्या तब्बल जागरणानंतर सकाळीं कडकडीत चहा नको प्यायला? नाटक सुटलं कीं बाहेरच्या दुकानांतून थर्मास् भरून घेतलाच बघ. पाहिजे तर पटवर्धनांनाच उद्यां सकाळीं चहाला आपल्याकडे बोलवूं या!"

काळ्याची ही दूरदृष्टि पाहून सुखात्म्याला अभ्यासापेक्षां स्वच्छंदीपणांत चालणाऱ्या त्याच्या डोक्याचें सखेद कौतुक वाटलें. "माझ्या पाठोपाठ उतर हं!" असें म्हणून काळे चटकन् खिडकीबाहेर गेला व दोरावरून उतरूं लागला. भिंतीवरून सरकन् जाणाऱ्या पालीप्रमाणें तो सुखात्म्याला वाटला. जमिनीला पाय लागतांच काळ्यानें जोरानें दोर हालविला. आतां छाती करून उतरण्याखेरीज सुखात्म्याला गतिच नव्हती. जीव मुठींत धरून तो कसाबसा जमिनीवर पोंचला. इतक्यांत

त्याला कसलीशी आठवण झाली व तो हळूच म्हणाला, "मी ताईच्या फोटोला नमस्कार करून यायला विसरलों रे. असाच चढून येऊं का नमस्कार करून? अगदीं टेबलावरच आहे फोटो!"

"कांहीं नको." काळे किंचित् कठोर स्वरानें म्हणाला. "कुणाला चाहूल लागली तर उगीच पंचाईत व्हायची. फोटोला नमस्कार करून जर कामं साधतीं तर मी परीक्षेंत नापास कशाला झालों असतों? पुस्तकांऐवजीं झाडून आजोबा–पणजोबांचे फोटोच टेबलावर रचून ठेवले असते आणि परीक्षेच्या दिवशीं त्यांच्यापुढं नाक घांसून मगच मडपांत गेलों असतों!"

काळ्याच्या या भडिमारापुढें सुखात्म्याचें तोंडच बंद झालें व ते दोघेहि मुकाट्यानें चालूं लागले. काळे पिंजऱ्यांतून सुटलेल्या सिंहाच्या आनंदानें पण सुखात्मे तुरुंगांतून पळून गेलेल्या कैद्याच्या साशंक मनोवृत्तीनें इकडे तिकडे पहात होता. सुदैवानें नाटकगृहापर्यंत त्यांना ओळखीचें कोणीच भेटलें नाहीं.

"सुखात्मे, चहा पिऊनच आंत जाऊं या. या म्हणावं पटवर्धनांना इथं चहा बंद करायला!" काळे डौलानें म्हणाला.

"पहिला अंक झाल्यावर पिऊं!" सुखात्म्यानें उत्तर दिलें. सुखात्म्याला राग येईल असें फोटोच्या बाबतींत आपण बोललों, हें काळ्याच्या मनांत थोडेसें डांचत होतेंच. तेव्हां या साध्या बाबतींत सुखात्म्याच्या मनाप्रमाणें वागण्याचें त्यानें ठरविलें.

दोघेहि चोराप्रमाणें इकडे तिकडे बघत आपल्या खुर्च्यांवर जाऊन बसले. सुखात्म्याचा दोस्त रंगायला जाण्याच्या बेतांत होता. ही दुक्कल आलेली पाहतांच तो तिला भेटायला आला.

"कशी छान जागा दिली आहे तुम्हांला! मागें पुढें काय चाललं

आहे, सारं दिसतं. आमच्या कंपनीचे कविदेखील प्रेक्षकांवर नाटकाचा होणारा परिणाम पाहण्याकरितां इथंच, अगदीं तुमच्या या मागच्या खुर्चीवर, बसतात. बरं, जातों मी रंगायला. दुसऱ्याच प्रवेशांत माझं काम आहे."

तो निघून गेल्यावर काळे व सुखात्मे एकमेकांशीं बोलण्याचा प्रयत्न करूं लागले. पण काय असेल तें असो, त्यांना मोकळ्या मनानें एकमेकांशीं बोलवेना. नाटक पाहणें म्हणजे मुलांच्या दृष्टीनें एकप्रकारचा महोत्सवच ! पण आनंदापेक्षां चिंतेचीच छाया या वेळीं त्या दोघां मित्रांच्या चेहऱ्यावर पसरली होती. मनुष्याचें मन त्याला जी शिक्षा करतें तेवढी न्यायाधिशालाहि करतां येत नाहीं, हेंच खरें. शेवटीं सुखात्मे तर 'आपण परत जाऊं या आणि दोरावरून चढून खोलीमधें गुपचूप निजूं या' असें म्हणाला देखील. पण याच वेळीं घंटा वाजली व रंगभूमीवरील दिवे अधिक उज्ज्वल झाले. त्या घंटेनें बाहेर जाऊं पाहणारें त्याचें मन खेंचून परत आणलें. दोघांनींही मागें, पुढें, खालीं, वर पाहिलें, सगळें थिएटर चिकार भरून गेलें होतें. फक्त त्यांच्यामागची एक खुर्ची तेवढी रिकामी होती. जें नाटक बघण्याकरतां शेंकडों लोक आतुरतेनें आले होते तें न पाहतां निघून जाणें म्हणजे पंचपक्वान्नांनीं भरलेल्या ताटावरून उठणें, असें त्या दोघांना वाटलें. इतक्यांत तिसरी घंटा होऊन पडदा वर झाला व सुंदर वेषाभरणांनीं सज्ज झालेल्या मुली नमनाचें पद गाऊं लागल्या. भोंवतालचा जनसंमर्द, झगझगीत प्रकाश, नटलेल्या व सुस्वरूप मुली, आणि गायनाच्या मधुर स्वरांचें इंद्रजाल यांच्या मिश्रणांत एक प्रकारचा सुप्त उन्माद असतो. त्या उन्मादाच्या स्पर्शानें काळे व सुखात्मे स्वतःला विसरून गेले.

पहिला प्रवेश संपेपर्यंत जणुं काय ते स्वप्नांत होते. शर्यतीच्या घोड्यांवर पैसे लावणारीं माणसें घोडयांच्या सूक्ष्म हालचालीबरोबर जशीं नाचत असतात, त्याप्रमाणें रंगभूमीवरील पात्रांच्या जीवनक्रमाशीं ही मित्रांची जोडी समरस झाली होती. गाढ झोंपीं गेलेल्या मनुष्याला खोलींत आलेल्या गेलेल्या मनुष्याची जशी दादही लागत नाहीं, त्याप्रमाणें काळे, सुखात्मे यांनाहि थिएटरमधील येजाचा पत्ता नव्हता. टाळ्यांच्या गजरांत पहिल्या प्रवेशाचा पडदा पडला. आतां दुसऱ्या प्रवेशांत आपल्या सोबत्याचें काम पहायला मिळणार म्हणून सुखात्मे अधिकच उत्कंठित झाला. "तो आला बघ" हे शब्द त्यानें उच्चारायला व काळ्यानें अवघडलेली मान नीट करण्याकरितां मागें पहायला एकच गांठ पडली. हॅम्लेटचा काका आपल्या भावाचें भूत पाहून दचकला नसता इतका काळे दचकला. तो एकदम ताठ उभा राहिला. "अहो खालीं बसा! तुम्हांला बघायला नाहीं आलों आम्हीं! ए टोपीवाला!" असले उद्गार कोल्हेकुईप्रमाणें एकदम मागून ऐकूं आले. सुखात्मे मागें वळून पाहतो तों मागच्या खुर्चीवर पटवर्धन सुपरिंटेंडंट बसलेले! विजेचा धक्का बसल्याप्रमाणें तो स्तंभितच झाला. लटलटणाऱ्या पायांनीं सुखात्मेहि त्याच्यामागून निघाला.

थिएटरबाहेर पडतांच सुखात्म्यानें धांवायला सुरवात केली.

"अरे वेड्या, भर रस्त्यानं असा अपरात्रीं धांवूं लागलास तर चोर म्हणून पोलीस धरतील कीं!" काळे ओरडून म्हणाला. सुखात्मे थांबला.

"धांवलं तर पाहिजेच; पण आडगल्ल्यांनीं धांवलं तर कुणाला संशय यायचा नाहीं. चल माझ्यामागून." असें म्हणून काळ्यानें एका अंधारी बोळांत प्रवेश केला. तिथल्या घाणीनें कुणाचेंहि डोकें

फिरून गेलें असतें! तिथल्या अंधारांत पाऊल टाकायला निधड्या छातीचा मनुष्यहि कचरला असता. पण करायचं काय? 'अडला काळे, गल्लीबोळांतुनी पळे!' धांवतां धांवतां काळ्यानें काखेंत अडकविलेला थर्मास हेलकावे खाऊं लागला व कशाला सा आपटून फुटलाहि. दोघानांहि किती ठेंचा लागल्या असतील, याची गणतीच नव्हती पानिपतहून शिर सलामत राखून आलेल्या नाना फडणवीसा-प्रमाणें दोघेहि एकदांचे आपल्या खिडकीखालीं येऊन उभे राहिले.

"हं सुखात्मे, जाणारा क्षण मोलाचा आहे. चढ तूं!" सुखात्मे चढून वर गेला; पाठोपाठ काळ्यानें खिडकी गांठली. आतां दोघांच्याहि जीवांत जीव आला. काळ्यानें घाई करून गजांना बांधलेला दोर सोडला व अंथरुणाखालीं लपविला. इतकें करीपर्यंत त्याचें सुखात्म्याकडे लक्षच नव्हतें. सर्व साफसफाई करून तो त्याच्याकडे पाहूं लागला, तों तो स्फुंदत होता.

"रडूं नकोस तूं असा. मी माझ्या अंगावर घेईन सारं. मग तर झालं!"

"त्याच्यासाठीं नाहीं रे!" हुंदके देत सुखात्मे म्हणाला. "टेबलावरला ताईचा फोटो कुणी चोरून नेला. तेवढा एकच होता रे तिचा फोटो!" काळ्याच्या डोक्यांत एकदम प्रकाश पडला; आपण बांधून ठेवलेल्या दोरावरून कुणीतरी चोर खोलींत आला असला पाहिजे व फोटोची चौकट सोनेरी दिसल्यामुळें त्यानें तो लांबविला असला पाहिजे, अशी त्याची खात्री झाली.

पटवर्धनांनीं रागारागानें खोलीचें कुलुप काढलें. पाहतात तों सुखात्मे ओक्साबोक्शी रडत असून काळे त्याचें सांत्वन करीत आहे.

"आतां रडून काय उपयोग, सुखात्मे? करावं तसं भरावं!" पटवर्धन दरडावणीच्या स्वरानें म्हणाले.

"सर, मला वाटेल ती शिक्षा करा; पण माझा फोटो—"

"कसला फोटो?"

"माझ्या ताईचा फोटो इथं टेबलावर ठेवला होता, तो कुणी चोरून नेला. चांगलं प्रायश्चित्त देवानं दिलं मला. माझी ताई आतां मला पुन्हां कुठं पहायला मिळणार? ताई, कां ग रागावलीस माझ्यावर?"

सुखात्म्याच्या अश्रुधारांनीं पटवर्धनांच्या रागाचा पारा हळूहळू उतरला. या प्रेमळ स्वभावाच्या व मातृहीन मुलाचा सारा जीव आपल्या मृत बहिणीवर होता व त्याच्यापाशीं असलेला तिचा एकुलता एक फोटो चोरून नाटकाला जाण्याच्या युक्तीमुळेंच चोरीला गेला, हें पूर्णपणें लक्षांत येतांच त्यांना सुखात्म्याविषयीं अनुकंपा वाटूं लागली. त्यांनीं दोघांहि मुलांना कोणतीच शिक्षा केली नाहीं. उलट तत्काळ त्यांच्या खोलीचें कुलुप काढून टाकलें.

दुसऱ्या दिवशीं बोर्डिंगांत जिकडे तिकडे सुखात्म्यानें ताईचा फोटो टेबलावरून कां काढून टाकला व काळे सुपरिंटेंडंटांच्या चहा-नाटकांविषयींच्या नियमांची तरफदारी कां करूं लागला, या विषयांवर कडाक्यानें चर्चा सुरू झाली. काळ्याच्या खिशांत तपकीर शोधायला गेलेल्या विद्यार्थ्यानें काळ्याला अफूचें व्यसन असल्याचा शोध लावल्यामुळें तर या चर्चेला आणखी फांटे फुटले! पण या क्रांतीचें मूळ मात्र शोधशोधूनही कुणालाच सांपडलें नाहीं.

१९२९

# राजकवि

त्या तीन कवींत राजकवि कुणाला करावें हें निश्चित करणें मोठें कठीण होतें.

महाराजांच्या परिवारांतील एका धष्टपुष्ट मनुष्या[illegible] [illegible] [illegible] ‘हा पिळदार दंडाचा कविच त्या पदाला योग्य आहे.’

एका सुंदर दासीनें एकदां भीतभीत सूचना केली ‘तो नाजूक कविच अधिक चांगला शोभून दिसेल!’

महाराज जनाचें ऐकत. पण त्यांचें मन कोड्यांत पडलें होतें. फुलें, तारका, सुंदर स्त्रिया, वगैरेंचीं वर्णनें तिन्ही कवि दररोज करीत. त्यांपैकीं अधिक चांगलें किंवा अधिक वाईट कोणतें हें कांहींकेल्या महाराजांना कळेना.

एके दिवशीं वनभोजनाचा बेत [illegible]ला. नेहमींपेक्षां निराळी जागा पाहण्यांत आली. नगरापासून फार दूर होता तो डोंगर! सहसा कोणी तिकडे जात नसे. पण त्या डोंगरांत एक अतिशय सुंदर देवालय कोरून काढलेलें होतें.

तिन्ही कवींसह महाराजांनीं त्या देवालयांत प्रवेश केला. किती मोहक दिसत होतें तें. जणुं कांहीं राकट शरीरांत वास करणारें प्रेमळ हृदयच !

पहिल्या कवीला स्फूर्ति झाली "किती सुंदर दगड आहे हा ! निसर्गापेक्षां मोठं असं जगांत कांहींच नाहीं."

दुसरा कवि देवाच्या मूर्तीला वंदन करीत उद्गारला "ही देवाची मूर्ति इथं नसती तर या दगडांना एवढी शोभा आलीच नसती. देवापेक्षां श्रेष्ठ असं काय आहे या जगांत ?"

तिसरा कवि शांतपणानें म्हणाला " या सौंदर्याचं श्रेय दगडाला नाहीं आणि देवालाहि नाहीं ! मनुष्याच्या बुद्धीचा विलास आहे हा !"

" खरं आहे राजकवि " त्याच्याकडे पाहून स्मित करीत महाराज उद्गारले.

१९३८

# खडकांतलें पाणी.

'कोण येणार आहे ग चहाला?'

मनगटावरील घडयाळाकडे पाहत सुनंदेनें मला विचारलें.

'एक मैत्रीण'

'फार गरीब आहे वाटतं?'

'कशावरनं?'

'घडयाळ नसावं तिच्या घरांत. साडेतीन झाले तरी—'

'गोष्टी लिहिणारांचं तर्कशास्त्र नेहमींच अजब असतं बघ सुनंदा!'

'तें कसं?'

'अग, फार श्रीमंत आहे ही मैत्रीण. सबंध गांवांत—'

'बरोबर आहे मग! श्रीमंत माणसं वेळेवर आलीं तर त्यांना श्रीमंत कोण म्हणेल?

'इतकी का घाई झालीय् तुला चहाची?'

'चहा घेऊन गोष्ट पुरी करायला बसणार आहें मी!

'कुठली?'

'काल तुला वाचायला दिली होती ती!'

'संगमरवरी खडक?'

'हो.'

'गोव्यांतलं सारं सौंदर्य पाहून हेंच सुचलं का ग तुला?'

'दुसरं काय सुचणार? केवढा भयंकर सामाजिक प्रश्न आहे हा! वेश्या! शुद्ध संगमरवरी खडक! किती दांपत्यांच्या संसारसुखाच्या नौका या खडकांवर आपटून—'

'टाळ्या वाजवूं का इथं?'

'कां?' सुनंदेनें चिडून विचारलें.

'मला वाटलं व्याख्यान सुरू झालं! पण व्याख्यानाला कमींत कमी तीन तरी माणसं नकोत का? एक अध्यक्ष, एक वक्ता आणि एक श्रोता! अध्यक्ष मुका आणि श्रोता बहिरा असला तरी चालतो. पण—'

'किती उथळ आहेस तूं लीला!'

'तुझ्यासारख्या लेखिकेइतकी तरी खास नाहीं.'

विंचवाचें वर्म जसें त्याच्या डौलदार शेंपटींत त्याप्रमाणें लेखकाच्या हृदयाचा नाजुक भाग त्याच्या लेखनांत असतो. त्याच्यावर घाव पडल्यामुळें सुनंदा उसळून म्हणाली, काय ग उथळपणा पाहिलास तूं माझ्या लिहिण्यांत!'

'कालचीच गोष्ट!'

'संगमरवरी खडक!'

'हो. तुला वाटतं—खडक म्हणजे क्रूरपणाचा अगदीं पुतळाच!

'खरंच! चुकलें मी! खडक म्हणजे लोण्याचा अगदीं गोळा नुसता मऊ मऊ—'

'तसं नाही—'

'मग कसं?'

'खडक वरून खडबडीत असतात. पण—'

'आंत काय अमृत असतं वाटतं त्यांच्या?'

'जिवंत झरा असतो त्यांच्या पोटांत! खडकांतलं पाणीच गोड असतं बरं फार. विहिरी खणणारांना जाऊन विचार हवं तर पण तुम्ही लेखक कशाला इतकी दगदग कराल? टेबलापाशीं बसायचं, ऐटीनं फाउंटनपेन हातांत घ्यायचं आणि चहाचे घुटके घेत लिहायचं—'

'दोन माणसांतच व्याख्यान सुरू झालं कीं हें—'

सुनंदेच्या टोमण्याकडे लक्ष न देतां मी पुढें म्हणालें, 'लेखक लिहिणार—वेश्या म्हणजे संगमरवरी खडक! त्यांना लग्नाचा नवरा नाहीं, अर्थात् नीति नाहीं! नीति नाहीं म्हणजे माणुसकी नाहीं.'

'तुझी मैत्रीणच येतीय् वाटतं ती! तिलाच कर अध्यक्ष आतां.'

इतक्यांत केशर दारांत आलीच. कपाळावरील घाम हातांतल्या रंगीत हातरुमालानें हळूच टिपीत ती म्हणाली, 'फार उशीर झाला नाहीं मला लीलाताई!'

'छे:, तसा नाहीं कांहीं—'

'माणसापेक्षां घड्याळंच खरं बोलतात म्हणायची!' केशर आपल्या मनगटावरील घड्याळाकडे पाहून हंसत हंसत म्हणाली. तिचें नाजुक सुंदर सोनेरी घड्याळ पाहून सुनंदेची दृष्टि नकळत तुलनेकरितां आपल्या हातावरील घड्याळाकडे वळली. मनांतल्या मनांत मला या मनुष्यस्वभावाचें हंसूं आलें. लाघवी स्वरांत केशर म्हणाली, 'निजून उठायलाच उशीर झाला वसंतरावांना—'

'बाहेर जायला परवानगी लागते का तुला केशर?'

‘ लागते असं नाहीं; पण सांगितलं म्हणजे दोघानाहि बरं ! कांहीं झालं तरी बाई पुरुषांचा स्वभाव ! तसा हिरवागार भाताचा मळा ! पण जिवाणू कुठं असेल—त्यांतून दुधानं तोंड पोळलं कीं—’

सुनंदा कुतूहलानें तिच्याकडे पाहूं लागली. केशरला एक दोन गाणीं म्हणायला सांगून मी चहा करूं लागलें.

केशर गात असतांना सुनंदा जणुं कांहीं त्या सुंदर स्वरांच्या लाटांवर तरंगत होती. केशरनें यायला उशीर केल्याबद्दल तिला आलेला राग या लहरींत कुठल्या कुठें नाहींसा झाला. गाणें संपतांच ती म्हणाली, ‘ केशरबाई, तुमच्यासारखं मला गातां येत असतं....’

‘ नि तुमच्यासारखं जर मला लिहितां येत असतं— ’

आम्हां तिघींनाहि हंसूं आलें. पण सुनंदेच्या हंसण्यांत आश्चर्याचा भागच अधिक होता. तसें पाहिलें तर ही माझी बेळगांवची बालमैत्रीण गोव्यांतलें सृष्टिसौंदर्य पाहण्याकरितां आलेली. मी गोव्यांत गांवींच आहें हें कळल्यामुळें काल संध्याकाळीं ती मला भेटायला आली. तिकडली स्वारी आपल्या इन्शुअरन्सच्या कामाकरितां परगांवी गेली होती. तेव्हां चहा घेतल्यावर सुनंदेला केशरच्या घरीं बसायला नेण्याचा माझा बेत होता. पण चहा पितांपितांच तिनें ती आपली अपुरी गोष्ट मला वाचायला दिली! ‘संगमरवरी खडक !’....ती गोष्ट वाचल्यावर सुनंदेला केशरकडे घेऊन जायला माझें मन घेईनाच. तेव्हां सकाळीं केशरकडे जाऊन तिला माझी बाळमैत्रीण आल्याचें मीं सांगितलें आणि चहाला बोलाविलें. चहा होतांच केशर जायला उठली.

‘ बैस ना ग जरा. अगदीं लग्नघाई—’

‘ आहेच कीं ! ’ तिनें हंसत हंसत उत्तर दिलें.

‘ आतां काय वरात निघायचीय् कीं काय मुहूर्तावर ?’

लहान मुलासारखी मान डोलवीत ती म्हणाली, 'फिरायला जातानासुद्धां बरोबर हवी मी वसंतरावांना. किती दिवस मुक्काम आहे पाहुण्याबाईचा ?'

'उद्यांच जाणार म्हणते ती!' मी उत्तर दिलें.

'मग उद्यां सकाळीं माझ्याकड—'

केशरचं चहाचं आमंत्रण सुनंदेला कितपत परवडेल याची मला शंकाच होती. मीं नजरेनें तिला खुणाविलें.

आणि तिनें तें वाक्य अर्धवटच सोडलें.

ती निघून गेल्यावर सुनंदा म्हणाली, 'मोठं सुखी दिसतंय हें जोडपं!'

'हं—!'

'नुकतंच लग्न झालंय वाटतं ?'

'हं—!

'नि गाते किती छान ती! बाकी वेंधळेपणांत थोडी छचोर आणि बोलण्यांत जराशी फटकळ आहे, नाहीं ? वसंतराव, वसंतराव! दोन वाक्यांत चारदां नांव घेतलंन् नवऱ्याचं! आणि वेंधळीच आहे जरा! चहाला बोलवायचं होतं मनांत, पण धड बोललीच नाहीं कांहीं! आपल्याच जातीची आहे का ही ?'

'आपल्या म्हणजे बायकांच्या कीं—'

'काय चाहटळ झाली आहेस तूं लीला! नवरा इन्शुअरन्स कंपनीचा एजंट झाला कीं त्याची बायको देखील बडबडायला लागते वाटतं ?'

'खरंच सांगितलं मी तुला!'

'पण तिची जात कोणती ?'

'तशी जातच नाहीं तिला! वेश्या आहे ती! पूर्वी मुंबईला एका गुजराथ्यापाशीं होती. हल्लीं या वसंतरावाकडे आहे!'

सुनंदेनें एकदम एवढाले डोळे केले. पण लगेच राग आंतल्या आंत गिळून ती म्हणाली, 'बरीच आहेस हं तूं लीला! आत्तां कळलं तुला कालची गोष्ट कां आवडली नाहीं तें! प्रेम आंधळं असतं बरं लीलाताई! तुझ्यासारखीशीं सख्य करून सभ्यपणाचा आव आणायला बघत असेल ही केशर! पण किती झालं तरी खडक तो खडक! मग तो संगमरवरी असो, नाहींतर काळा कुळकुळीत असो! त्या गुजराथ्याला धुळीला मिळवून आली असेल ही केशर इथं! होय ना?'

मी स्तब्ध राहिलें.

'कां लीला, गप्पशी बसलीस?'

'या खडकांतलं गोड पाणी देणार आहें मी तुला प्यायला.'

सुनंदा चमकली. फोटो घेण्याकरितां फोटोग्राफर जशी रचना करतो, तशी मी मनांतल्या मनांत माझ्या अनुभवाची जुळवाजुळव करूं लागलें.

  

'सुनंदा, केशरला पाहिलं कीं धरणीकंपाची आठवण होते मला.'

'वेश्या आणि भूकंप! चांगला विनोदी लेख—'

'सारं ऐकून घे आधीं आणि मग थट्टा कर हवी तितकी! सुनंदा, माणसाच्या मनांतसुद्धां धरणीकंप होतात. नाहीं का? या केशरविषयींचं माझं पूर्वीचं मत आणि आजचं— लग्न होऊन मी ज्या दिवशीं इथं आलें त्याच दिवशीं देवळांत आम्ही जोडप्यानं देवाच्या

दर्शनाला गेल्ों. तिथं पाहिली मीं पहिल्यांदा या केशरला. तिचं तें मोहक रूप, गुलाबी जरीचं पातळ, अंगावरले सुंदर दागिने, केसांची पाठीवर सोडलेली वेणी—माझी नजर एकदम स्वारीकडे गेली. तेहि तिच्याकडे पाहताहेत असं मला वाटलं. त्या वेळीं केशरचा असा राग आला म्हणतेस मला—'

'म्हणजे तुझे पतिराज इतके का हे—'

'छे: ग, अगदीं गंगाजळ आहे तिकडलं मन!'

'म्हणून देवदर्शनाच्या वेळीं केशरकड बघत होते वाटतं! हें बघ लीला, मुलखाची भोळी आहेस तूं!'

'ते बघत होते त्याचं कारण होतं निराळंच!'

'चित्र काढायचं असेल त्यांना सुंदर ! इतक्या प्रतिभाशाली चित्रकाराला इन्शुअरन्स कंपनीचा एजंट व्हायची पाळी यावी ना? हिंदुस्थानांत गुणांचं चीज होत नाहीं हेंच खरं!'

'तिला पाहिल्यावर फार वाईट वाटलं त्यांना!'

'कुणाबद्दल? स्वत:बद्दल कीं—'

'माझ्याबद्दल!'

'तूं तिच्याइतकी सुंदर झाली नाहींस म्हणून—'

'तिच्या अंगावरील दागिने माझ्या हक्काचे होते—'

'तुझ्या हक्काचे?'

'हो, तिची आई मामंजीपाशीं होती म्हणे. मामंजींनीं आपलं घर धुतलं आणि त्या बाईच्या घराला सोन्याचा रंग दिला.'

'संगमरवरी खडक!' मिस्किलपणानें सुनंदेनें दोनच शब्द उच्चारले. पण तिच्या बोलण्याकडे लक्ष न देतां मी पुढें सांगूं लागलें.

'देवळांतून घरीं आल्यावर तिकडून सारं सांगणं झालं मला! मामं-

जींच्या या नादानं तिकडलं शिक्षणसुद्धां अर्धवटच राहिलं. नोकरी मिळेना म्हणून विम्याचा धंदा पत्करला. पण या धंद्यापायीं स्वारीला नेहमीं बाहेर फिरावं लागे. मला एकटीला घर कसं खायला येई. अशा वेळीं मी या केशरला आणि तिच्या आईला शिव्यांची लाखोली वाहत बसे. मला वाटे—त्या अवदसेनं जर मामंजींना नागवलं नसतं तर—स्वारीची वणवण आणि माझी तळमळ यांचं खापर या केशरच्या आईवर फोडून मी माझ्या कष्टी मनाचं समाधान करून घेई.'

हें ऐकतांना सुनंदेच्या चेहऱ्यावर अभिमानाची छटा येऊन गेली. हंसत हंसत तिनें विचारलें, 'या गोष्टींतली नायिका कोण? तूं, केशर कीं केशरची आई?'

'कुणी का असेना?'

'वा:! तूं गोष्ट सांगते आहेस मला! गोष्ट म्हणजे लघुकथा आणि लघुकथा म्हणजे तंत्र! तें तंत्र असं म्हणतं कीं—'

मी नुसती हंसले.

'बरं बाई, तुला येईल तशी सांग. मग तर झालं!'

'पुढं पणजीला कुणी श्रीमंत गुजराथी व्यापारी आला होता मुंबईचा. त्याला केशरची माहिती मिळाली. तो इथं आला, तिच्यावर खूष झाला आणि तिला दरमहा तीनशेंवर मुंबईला घेऊन जायला तयार झाला. ज्या दिवशीं मीं हें ऐकलं त्या दिवशीं मी देवाला नवस केला कीं, या गुजराथ्याचं आणि केशरचं पटूं देऊं नको. येऊं दे तिला रडत परत गांवीं!'

'वसंतराव काय देतात तिला?'

'तीस चाळीस असतील.'

'देव तुझ्या नवसाला पावला म्हणायचा!'

'तो पावला असता तर? तर काय झालं असतं तें त्याचं त्यालाच ठाऊक!'

सुनंदेच्या डोळ्यांत आश्चर्य चमकूं लागलें.

'तिकडून बाहेरगांवीं जाणं झालं कीं मी गोष्टी वाचून वेळ घालवी. एकसारख्या एका ठशाच्या गोष्टी वाचायच्या! मध गोड असला तरी तो कुणी पीत बसतं का? त्या गोष्टींनीं तर माझं कपाळच उठे. ओळख नसलेलीं माणसं गोष्टींत प्रेम करीत बसतात आणि आम्ही नवराबायको मात्र—वाचण्याचा कंटाळा आला कीं मी देवळांत जाई. तिथं मात्र तिखटमीठ भरपूर मिळे नेहमीं. त्या वेळीं अशीच गेलें होतें मी—'

'मी सांगूं पुढचं?'

'हं.'

'तिथं केशर तुला भेटली आणि—'

सुनंदा मनकवडी आहे कीं काय हें मला कळेना.

'आणि तिचं व तुझं रहस्य जमलं!

'अं हं!' ती हंसत हंसत माझ्यापाशीं आली आणि म्हणाली, 'मी मुंबईला जातेंय् उद्यां. ओळखदेख ठेवा हं माझी.'

मीं म्हटलं, 'एका गांवच्या आपण! ओळख विसरूं म्हटलं तरी विसरायला होईल का?' माझं मन कसं जळत होतं आंत! पण बाहेरून शांतपणा दाखविला मी!

'गवयाचं पोर रडलं तरी तालासुरांत रडतं ना? तशीच वेश्येची मुलगी. गोड बोलायला शिकवावं का लागतं तिला? त्या दोन गोड शब्दांनींच झाली वाटतं ही तुझी मैत्रीण?'

'दोन शब्दांनींच खरी! पण ते शब्द दुसरे होते.'

माझ्या डोळ्यांपुढें मुंबईतला तो विलक्षण प्रसंग उभा राहिला. भर दिवसा माझ्या डोळ्यांना अवसेचा अंधार दिसूं लागला होता. माणसांनीं गजबजलेल्या रस्त्याला माझ्या दृष्टीनें अरण्याची अवकळा आली होती. उघड्या डोळ्यांनीं पाहिलेलें तें भयंकर स्वप्न! अजून आठवण झाली कीं कांटा उभा राहतो अंगावर. मी स्तब्ध राहिलेली पाहून सुनंदा म्हणाली, 'काय लीला? केशराला अंगचा असावा लागतो वास. असा चिकटवून—अगबाई! डोळ्यांत पाणी उभं राहिलंय् कीं तुझ्या!'

'आनंदाचं—अगदीं गोड पाणी आहे तें! खडकांतलं म्हणेनास!' असें म्हणत मीं डोळे पुसले, आणि बोलूं लागलें.

  

'कंपनीच्या कामासाठीं तिकडून मुंबईला जाणं झालं होतं. आधींच मनासारखा वैरी नाहीं कुणी. त्यांत मुंबईला देवीची सांथ सुरू झालेली. दिवस उजाडला कीं मनांत नाहीं नाहीं ते विकल्प येत. पोष्टाचा शिपाई घराकडे येऊं लागला कीं पोटांत गोळा उठे. मनांत येई—ते पैसे नकोत, तें कंपनीचें काम नको आणि ही जीवटांगणी नको. दोघे एका जागीं असलों तर पेजेवर देखील राहूं. पण पेज तरी काय पैशावांचून मिळते? गांवांतलं कुणी मुंबईला जायला निघालं कीं मला त्याचा हेवा वाटे. तें माणूस मुंबईला जाणार—त्याच्या दृष्टीला स्वारी पडेल! आणि मी? मीं पत्रांतल्या अक्षरांकडे पहात इथें काळ कंठायचा!

'रात्रीं पहिली झोंप झाली कीं दचकून जाग येई आणि मन कसें बावरून जाई. अपरात्रीं भुतं फिरायला बाहेर पडतात असं म्हण-

तात ना? तीं माझ्यासारखीच्या मनांतच त्या वेळीं नाचायला लाग-तात. अमंगळ कल्पना डोळे मिटून घेतले तरी स्पष्ट दिसत. लहान-पणची वडिलांच्या मरणाची ती आठवण!

'खरंच! एकदम किती विलक्षण कळा यायला लागल्या त्यांच्या पोटांत! लोकांनीं इस्पितळांत नेलं त्यांना? पण तिथल्या निष्काळजी-पणानंच घात घेतला सारा!' तें सारें आठवून सुनंदा म्हणाली.

'राहून राहून हेंच माझ्या मनांत येई. साऱ्या मुंबईत गांवचीं अशीं माणसं चारपांचच! त्यांतून भीड तर स्वारीच्या पांचवीला पुज-लेली! वेळ कांहीं सांगून येते का? आणि भित्यापाठीं ब्रह्मराक्षस म्हण-तात ना? शेवटीं घडलंहि तसंच!'

'काय झालं?' कंपित स्वरानें सुनंदेनें विचारलें.

'ज्याच्या बिऱ्हाडीं हे उतरले होते त्याची तार आली. भयंकर ताप आला होता तिकडे.'

'अगबाई!'

'तार पोंचल्यावर पाणीसुद्धां घोटलं नाहीं मी घरांत. तडक पण-जीला गेलें आणि सोबत बघून मुंबई गांठली. ते ज्याच्या बिऱ्हाडीं होते त्याला तार केली होती म्हणून बरं! नाहींतर बंदरापासूनच वनवासाला सुरवात झाली असती. जीव मुठींत घेऊन मीं बिऱ्हाडीं गेलें! तिकडे शुद्धिसुद्धां नव्हती धड! अंगावर बारीक पुळ्या दिसूं लागल्या होत्या.'

'या प्रसंगांत तूं केशरकडे गेलीस नी तिनं तुला पैशाची मदत केलीन्! असंच ना?'

'मोकळ्या मुठीनं मदत करणारीं माणसंसुद्धां थोडींच असतात जगांत. पण मुठीपेक्षांहि हृदय उघडणं अधिक कठिण असतं! नाहीं?'

नंदा उत्कंठेनें माझ्याकडे पाहूं लागली.

'मला जाऊन तास झाला नाहीं तोंच बिऱ्हाडाचा मालक म्हणाला, 'इस्पितळांत नेऊन ठेवू या यांना! चाळींतले लोक काल-पासून अगदीं मागं लागले आहेत माझ्या.' एका दृष्टीनं लोकांचें बरोबर होतें. ज्याची त्याला काळजी असतेच कीं! पण स्वारीला इस्पितळांत न्यायचं म्हटल्याबरोबर माझ्या उरांत धडकीच भरली. बाबांची आठवण झाली. डोळ्यांत पाणी आणून मी त्या माणसापुढें पदर पसरला. पण चाळींतल्या लोकांपुढें तो बिचारा काय करणार? शेवटीं इस्पितळांत जायची पाळी येऊं नये म्हणून मीं एक व्हिक्टोरिया केली आणि स्वारीला तिच्यांत कसेंबसें निजवून सारी मुंबई फिरूं लागलें.'

'कुठं गेलीस तूं त्यांना घेऊन?'

'कुठं जाणार? तिकडल्या डायरींत गांवच्या माणसांचे पत्ते होते सारे. त्यांना शोधून काढलें. पण प्रत्येकजण म्हणे, 'आमच्याकडे नको ही भानगड! इस्पितळांत ठेवा. होईल ती मदत करूं आम्हीं!'

'एकामागून एक सारी घरं फिरलं. पण डोकें टेंकायला जागा कांहीं मिळाली नाही. शेवटीं आमच्याच जातीचा गांवचा एक श्रीमंत मनुष्य होता. तो तेवढा राहिला. त्याचा बंगला चांगला होता म्हणे. वेडया मनाला वाटलं—बाजूची एक खोली द्यायला काय हरकत आहे त्याला? त्या खोलींत रात्रीचा दिवस आणि रक्ताचं पाणी करून मी स्वारीला बरं करीन! पण इस्पितळाच्या दारांत जाण्याची पाळी देवानं आणूं नये माझ्यावर. गाडीवाल्याला त्या बंगल्याचा पत्ता सांगून मी निघालें. मधल्या अर्ध्या तासांत त्रिभुवन आठवलं मला. गाडी बंगल्या-पुढं थांबली. मी कांपऱ्या पायांनीच आंत गेलें. लाज भीड सोडून मालकिणीची ओळख उकरून का[illegible]या बसा' म्हटलंन् तिनं!

चहा आणायला सांगितला. माझं कांपरं कमी झालं. पण [illegible] आलें आहे हें कळतांच ती ताडकन् उठली आणि कर्कश स्वरानें [illegible]डली 'लेकराबाळांनीं भरलेलं घर आहे माझं! लाज नाहीं वाटत असलं कांहीं विचारायला तुह्मांला? एक सोडून दहा इस्पितळं आहेत मुंबईंत! तिकडून पांच हजार दिलेतसुद्धां एकाला. तिथं चिठ्ठी हवी असेल तर देववीन मी. पण—'

'मी डोळे पुसत बाहेर आलें. काय करावें तें सुचेना. डोळ्यांपुढें अंधेरी येऊं लागली. फाटकाचा आधार घेऊन मी उभी राहिलें. पण गाडीवाल्याच्या मागें त्याचें पोट होतेंच की! तो गडबड करूं लागला. त्याला उत्तर द्यायलासुद्धां माझ्या तोंडातून शब्द उमटेनात. भरलेल्या डोळ्यांपुढें इस्पितळाचें भेसूर चित्र उभें राहिलें. बाबांच्या मृत्यूची भयंकर आठवण होऊन—'

'कसे प्रसंग येतात माणसावर!'

'हातांनीं तोंड झांकून मी रडत होतें. इतक्यांत रस्त्यानें जाणारी एक मोटार थांबल्याचा आवाज झाला. मी माझ्याच दुःखांत होतें. पण 'ओळख[illegible]सरणार नाहीं म्हणाला होतां ना?' हे शब्द कानांवर पडतांच मी मान वर करून पाहिलें. केशर माझ्यापुढें उभी होती. माझा रडवा चेहरा पाहतांच ती चरकली. सख्खी बहीण भेटावी तसें मला झालें. तुटक शब्दांत मी सारी हकीकत सांगितली तिला. तिनें दोनच शब्द उच्चारले, 'चला माझ्याबरोबर. दोनच शब्द!'

सुनंदा आश्चर्यचकित होऊन माझ्याकडे पाहत होती.

'केशरनं आम्हाला स्वतःच्या बंगल्यांत नेलं. तिचं मन किती मोठं आहे तें त्या क्षणीं कळलं मला. साधा मोठेपणासुद्धां क्वचित्‌च दिसतो

जगांत! जिकडे तिकडे सपाट जमीन फार, डोंगर थोडे. पण तिच्या मनाचा मोठेपणा—अगदीं हिमालयासारखा वाटतो तो अजून मला.'

' चांगला डॉक्टर आणला असेल तिनं?'

' डॉक्टर आणलान् हें तर झालंच! पण त्याशिवाय—त्या गुजराथी शेटजीनं तो बंगला दिला होता तिला. नेहमींप्रमाणें तो रात्रीं आला. गडीमाणसांकडून आधींच सारी बातमी लागली होती त्याला. आल्याबरोबर त्यानं केशरशीं भांडायला सुरवात केली. 'आतांच्या आतां इस्पितळांत पाठवून देतों रोग्याला ' असें तो म्हणाला, तेव्हां पांचावर धारण बसली माझी! तावातावानें तो केशरला म्हणाला, ' असा कोण नवकोट नारायण लागून गेलाय् हा पेशंट?'

' तिनें उत्तर दिलें, ' माझ्या गांवचा माझा भाऊ आहे तो! तुम्हांला भीति वाटते तर येऊं नका चार दिवस इकडे.'

दोघांचें मोठें कडाक्याचें भांडण झालें. शेवटीं डोक्यांत राख घालून तो निघून गेला.

' पुन्हां तुझं तोंड या जन्मांत पाहणार नाहीं.' हे त्याचे शब्द ऐकून मला वाटलें—त्याच्या पाठोपाठ जावं आणि आम्हीं आतांच्या आतां निघून जातों म्हणून सांगावं. पण केशरनं मला पोटाशीं अगदीं घट्ट धरून ठेवलं. त्या क्षणीं—'युगं जातात, पण असले क्षण अमर असतात.'

१९३४

# पहिली चूक

आज इन्स्पेक्टरसाहेब पांच वाजण्यापूर्वीच घरीं जाण्याची तयारी करूं लागले हें पाहून हेड-क्लार्क आश्चर्यचकित होऊन गेले. नियमितपणासाठी एवढा प्रसिद्ध असलेला सूर्य ! पण ऋतुमानाप्रमाणें त्याच्या उदयास्ताच्या वेळांत थोडा तरी फरक पडतोच पडतो. प[illegible] ए[illegible] इन्स्पेक्टर गोडबोले हे मात्र उन्हाळा असो, आकाशांतून वृष्टि होवो अथवा मुसळधार पाऊस कोसळो, अकराच्या ठो[illegible] कचेरींत शिरत व पांचाच्या ठोक्याचा आवाज हवेंत पूर्णपणें [illegible] झाल्याखेरीज खुर्चीवरून उठतदेखील नसत. मित्रमंडळींत साहेबांच्या गोष्टी नि[illegible]या म्हणजे हेडक्लार्क त्यांना "सवाई सूर्य' ही पदवी देत, याचें कारण त्यांचा विलक्षण नियमितपणा हेंच होतें. त्यांची मित्रमंडळी मात्र या पदवीचा कीस काढीत आणि इन्स्पेक्टरसाहेब फार कडक असल्यामुळेंच त्यांना ही पदवी मिळाली असावी, शाळा तपासायला ते आले म्हणजे शिक्षकांच्या व विद्यार्थ्यांच्या अंगांतून घामाच्या धाराच गळत असाव्यात, इत्यादि कल्पनांचे मजल्यावर मजले उभारीत. सृष्टींतला सूर्य हळुहळु थंड होत चालला आहे असें शास्त्रज्ञ म्हणतात!

पण शिक्षणखात्यांतला हा सूर्य मात्र दिवसेंदिवस उष्णच होत जाणार, असें खुद्द गोडबोल्यांच्या हाताखालील कारकुनांचेंच मत होतें.

त्यामुळें 'न भूतो न भविष्यति' असा साहेबांच्या अकाल-गमनाचा हा देखावा पाहून हेडक्लार्कना, आपण स्वप्नांत तर नाहीं ना, असा क्षणभर भास झाला. पण इन्स्पेक्टर गोडबोले यांच्या कचेरींत भर दिवसा साडेचार वाजतां कुंभकर्णालादेखील झोंप येणें शक्य नसल्यामुळें स्वप्नाच्या आभासाची कल्पना तत्काळ नाहींशी झाली. साहेब आजारी बिजारी तर नाहींत ना, असा संशय येऊन हेडक्लार्कनीं त्यांच्याकडे पाहिलें. सूर्याला ग्रहण लागलें नसलें तरी त्याच्यावर अभ्रें आलीं होतीं हें निश्चित! पण आपण साहेबांची मुख-परीक्षा करीत बसलों तर हातांतील काम तसेंच राहून जाईल असें वाटून हेडक्लार्क, आजाऱ्याला त्रास होऊं नये म्हणून ज्या मंद स्वरानें [illegible] त्या स्वरानें म्हणाले, "कालच्या या मुलाचं काय करायचं?"

पगडी ठाकठीक करीत इन्स्पेक्टर म्हणाले, "कुठला

"त्या पुअर बॉइज स्कूलमधला."

"तो ब्रम्हदेवाचा बाप ना?"

साहेबांचा रोंख ध्यानांत न आल्यामुळें हेडक्लार्कनीं [illegible] उद्गार-चिन्हयुक्त चेहरा प्रश्नचिन्हांकित केला.

कोटाची कॉलर नीट आहे कीं नाहीं हें चांचपून पहात साहेब म्हणाले, "जन्मतारखेंत बदल करणारा तो वीर ना? ब्रह्मदेवानं दिलेलं वर्ष कबूल करायला तयार नाहीं बेटा. करा दोन वर्षं डिबार."

"दोन वर्षं?" शिक्षा फार कडक होत आहे असें वाटून हेड-क्लार्कनीं विचारलें.

"हो, हो; दोन वर्षं. बेट्यानं सेव्हनचे टेन किती बेमालूम केले होते म्हणतां! आज सोडला तर उद्यां खोट्या सह्यासाक्षींचा धंदाच आरंभील तो." साहेबांचा उच्चार म्हणजे ब्रह्मलिखित, असा नेहमीचा अनुभव असल्यामुळें अधिक हुजत घालण्यांत अर्थ नाही असा हेड-क्लार्कनीं पोक्त विचार केला. आकाशांतून खालीं पडलेली वीज परत आभाळांत जाणें व गोडबोल्यांनीं आपला हुकूम परत घेणें या दोन्ही गोष्टी सारख्याच शक्य होत्या.

  

झोंपेंत चालणाऱ्या मनुष्याला भोंवतालीं काय चाललें आहे याची कल्पनाहि येत नाही. मनाला एकच ध्यास लागला की माणसाची अशीच स्थिति होते. आपण घरीं कुठल्या रस्त्यानें आलों हें देखील गोडबोल्यांच्या ध्यानांत आलें नाहीं. घरी येतांच त्यांनीं पत्रां पेटीची प्रथम तपासणी केली. पेटी रिकामी असलेली पाहून त्यांनीं घाईघाईने कॉलबेल वाजविली. "आलें हो, बाबा." असे शब्द व त्यांच्या पाठो-पाठ पावलांची चाहूल ऐकूं आली. दरवाजा उघडतांच गोडबोले म्हणाले—"पत्रं आलीं आहेत का, लिली?" लिलीनें मानेनें होकार दिला व वडील आपल्या खोलींत पोंचतात न पोंचतात तों त्यांच्या हातांत टपाल आणून दिलें. पगडी टेबलावर ठेवून कोट न काढतांच गोडबोले आपलें खाजगी टपाल चाळूं लागले. दुकानांतील पुष्कळ लुगडीं पाहूनहि आपल्या आवडीच्या रंगाचें व पदराचें लुगडें मिळालें नाहीं म्हणजे एखाद्या स्त्रीची मुद्रा जशी उदास होते, त्याप्रमाणें खिन्न चेहरा करून त्यांनीं टपाल भिरकावून दिलें. तत्वज्ञानावरील दोनतीन मासिकें ते मुद्दाम मागवीत असत. आजच्या टपालांत त्यांपैकीं एक होतें.

पण यावेळीं तत्त्वज्ञानाचे घुटके घेण्याला त्यांचें मन स्वस्थ होतें कुठें?

लिली चहा घेऊन आली. चहाचा पेला तोंडाला लावून गोडबोल्यांनीं त्याचे दोनचार घुटके घेतले व ते एकदम लिलीकडे वळून म्हणाले, "लिली, आज तूं लवकरशी आलीस शाळेंतून?"

"माझं किनई डोकं दुखत होतें, बाबा." लिली खिडकींतून पहात म्हणाली.

"डोकं दुखायला काय झालं? उठल्यासुटल्या सिनेमाला जातेस त्याचंच हें फळ! बस्स! आजपासून सिनेमा बंद! पदरचे पैसे खर्च करून रोग पैदा करायला सांगितलं आहे कुणी? उद्यां तूं एका आय्. सी. एस्. ची बायको होशील. बायकोचं सारखं डोकं दुखूं लागलं तर त्यानं बापड्यानं काय करावं? तिचं डोकं धरून बसावं कीं आपलं काम करावं?"

"सिनेमानं नाहीं हो बाबा तसं होत."

"मोठी डॉक्टरीणच झालीस कीं नाहीं? सिनेमाचा डोळ्यांवर परिणाम होतो आणि डोळ्यांचा डोक्यावर होतो हें सांगायला डि. ओ. च पाहिजे असं नाहीं."

आपल्या खालच्या ओंठावर दांत रोंवून लिली क्षणभर गप्प बसली व नंतर भिंतीवरील जॉर्ज बादशहांच्या फोटोकडे नजर लावून म्हणाली, "पण माझं डोकं मुळीं दुखतच नाहीं, बाबा."

"म्हणजे?"

"मधल्या सुट्टींत मी घरीं आलें तेव्हां माणिक—वर्षापूर्वी लग्न झालं बघा तिचं. माणिक बाळंतीण झाल्याचं कळलं. ती नी मी पहिलीपासून अगदीं बरोबर नव्हतों का, बाबा? मला किनई तिच्याकडे गेल्याशिवाय रहावेना अगदीं. कसा छान, गोरापान मुलगा आहे

म्हणतां तिचा ! ”

“ कालिदास म्हणतो तें कांहीं खोटं नाहीं.” गोडबोले निराशेनें म्हणाले.

‘ आलक्ष्य दन्तमुकुलान् ’ हा श्लोक गुणगुणत चहाचा पेला घेऊन लिली निघून गेली.

‘ स्त्रीणामशिक्षितपटुत्वममानुषीषु । संदृश्यते किमुत या प्रतिबोधवत्यः ’ या चरणांचा विचार करीत गोडबोले बसले. टेबलावर पडलेल्या टपालाकडे नजर जातांच न आलेल्या पत्राची त्यांना आठवण झाली. त्यांच्या मनांत विचारलहरी उसळूं लागल्या—आज उत्तर यायलाच पाहिजे होतं. आठवल्याला मी मराठी पहिलीपासून खतोंय् अगदीं. जन्मभर बरोबर चालणारं घड्याळ आहे तें नुसतं. कां लिलीला करून घ्यायचं मनांतच नाहीं त्यांच्या ? मी कांहीं झालं तरी इन्स्पेक्टर ! शामभट्टाची तट्टाणी म्हणणार नाहीं कुणी. [illegible] घोडा म्हटलं तरी इंद्राच्या ऐरावतापुढं किंमत काय त्याची ? जुनी मैत्री लक्षांत आणून एक आय्. सी. एस्. आपल्या आय्. सी. एस्. मुलाला इन्स्पेक्टरची मुलगी करून घेईल, हें या द्रव्ययुगांत कितपत शक्य आहे ? फार दयाळू न्यायाधीश म्हणून त्याची कीर्ति आहे. पण त्याच्या मुलावर मुलींच्या बापांच्या उड्या पडत असतील नुसत्या. हुंडयाच्या लांब उडींत जो पहिला येईल तोच याचा व्याही होईल. पण गृहस्थानं नकार तरी कळवायचा ! बाळपणाची मैत्री म्हणजे खडकावरली इमारत असं म्हणतात ! पण हा लोभ आहे ना जगांत ? खडकाची वाळू करणं हा त्याच्या अगदीं हातचा मळ ! बॅरिस्टरच शोधावा झालं लिलीला आतां.

  

रात्र आली तशी गेली. बारा आंकड्यांचा तोच तो प्रवास न कंटाळतां करणाऱ्या घड्याळाप्रमाणें जगानें दुसऱ्या दिवसाच्या कार्य-क्रमाला सुरवात केली. बरोबर अकराच्या ठोक्याला गोडबोल्यांचें पाऊल आपल्या कचेरींत पडलें. आज साहेब यंत्राप्रमाणें सह्या करीत आहेत, समोरील कामांत त्यांचें मन मुळीच नाही, हें हेडक्लार्कनी लवकरच ओळखलें. प्रत्येक प्रकरणाकडे सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पहा-णारी त्यांची दृष्टि आज आंधळ्याप्रमाणें हेतुशून्य दिसत होती. चार वाजून जातांच साहेबांचें शरीरहि अस्वस्थ होऊं लागलें. आजहि पांचाच्या ठोक्याची वाट न पहातां ते घरीं गेले.

घरीं निराशेचें ताटच आपल्यापुढें वाढून ठेवलें आहे असें त्यांना आढळून आलें. अपेक्षित पत्रें आल्यामुळें गरीब असलेल्या लोकांना देखील आज आनंदाचा अनुभव घेतां येत असेल; पण आपल्या कपाळी मात्र तो नाहीं, असा विचार त्यांच्या मनांत या वेळीं आल्यावांचून राहिला नाहीं. एखादी स्त्री श्रीमंत असली म्हणून तिला मातृपदाचें सुख मिळतेंच असें कुठें आहे?

आपल्या नियमितपणाच्या लौकिकाला गालबोट हें लागलेंच. दररोज आपण लवकर घरीं जाऊं लागलों तर हें गालबोटाचें काळें वाढत जाईल, असा विचार तीन दिवसांनी गोडबोल्यांच्या मनांत आला व चवथ्या दिवशीं पत्राच्या मोहाला बळी पडायचें नाहीं असें त्यांनी ठरविलें. त्यांच्या या निश्चयाचें फळ त्यांना त्याच दिवशीं मिळालें. मनोराज्यांतील त्यांचे व्याही आठवले यांचें आपण पैहि हुंडा न घेतां लिलीला सून करून घ्यायला कबूल आहों, असें पत्र दुसरेच दिवशीं आलें. एकदोन दिवसांत आपण मुंबईला येत आहों असेंहि आठवल्यांनीं पत्रांत लिहिलें होतें.

दुसरे दिवशीं सकाळीं गोडबोले आपलें तत्त्वज्ञानाचें मासिक मोठ्या आवडीनें वाचीत व लिलीच्या लग्नांत जांवयांना कोणत्या रंगाचा सूट द्यावा याचा विचार करीत आरामखुर्चीवर पडले होते. घंटानादानें त्यांच्या या समाधीचा भंग होऊन त्यांनीं "कोण आहे?" म्हणून गड्याला विचारलें.

"मुलगा आला आहे एक.!"

"आंत पाठवून दे त्याला."

सुमारें सतराअठरा वर्षांचा एक उंच, फिक्कट चेहऱ्याचा मुलगा आंत आला. वाघापुढें जाणाऱ्या शेळीप्रमाणें त्याचें अंग थरथर कांपत होतें. त्याच्या अंगावरले कपडे अगदीं जीर्ण झाले असून चेहऱ्यावरहि दारिद्र्यामुळें येणारें दैन्य स्पष्ट दिसत होतें.

"काय काम आहे?" हातांतील तत्त्वज्ञान मिटून व अंगठा आणि करंगळीजवळचें बोट यांनीं चष्म्याची नाकावरून कपाळावर उचलबांगडी करून इन्स्पेक्टरांनीं विचारलें. त्या मुलानें त्यांच्याकडे पहाण्याचा धीर झाला नाहीं. त्याच्या कपाळावरून घाम निथळत होता.

"काय हवं तुला?" इन्स्पेक्टरच्या तत्त्वज्ञानाची जागा वीर-रसानें घेतली होती असें या प्रश्नाच्या स्वरावरून कुणीहि अनुमान केलें असतें. आपण गप्प राहिलों तर साहेब आपल्याला वेडा म्हणून हांकलून देतील असें वाटून त्या मुलानें उत्तर दिलें,

"मी—मी—पुअर बॉइज् स्कूलमधें आहे."

"मग काय पाहिजे तुला? गरीब आहेस? हे घे चार आणे." गोडबोल्यांनीं टेबलावरील चांदीच्या वाटींतील एक पावली उचलली व त्याच्यापुढें फेंकली. त्या मुलानें त्या पावलीकडे ढुंकूनदेखील बघितलें नाहीं.

"पावली कमी वाटली तुला? मोठा बाजीरावाचा बेटाच दिसतोस!"

खोल विहिरींत पोहायला उडी टाकण्याच्या वेळीं मनुष्य जसा पुनः पुन्हां वांकून पाहतो त्याप्रमाणें तो मुलगा इन्स्पेक्टरांच्या चेहऱ्याकडे बारकाईनें पहात होता. शेवटीं सर्व धीर एकवटून तो म्हणाला, "जन्मतारीख ब—बदलली आहे मी."

"अस्सं! ते ठकसेन राजपुत्र तुम्हीच होय? दोन वर्षांची रजा मिळालीच आहे तुम्हाला!"

"घरीं आई नि धाकट्या दोन बहिणी आहेत. बाकी कुणी नाहीं, साहेब. साहेब गरिबावर दया करा."

"पण गरिबानं प्रामाणिकपणानं कां वागूं नये?"

तो मुलगा खालीं मान घालून अडखळत बोलूं लागला, "घरीं पेज खाऊन रहातों आम्ही, साहेब. स्कॉलरशिप मिळविण्याच्या आशेनं वय बदललं मी. वयाची अट आहे त्या स्कॉलरशिपला."

"छान केलंस! उद्यां खिसे कापायला लागशील!"

"नाहीं, साहेब. अगदीं नाहीं. फीला पैसा नाहीं घरांत. मॅट्रिक झाल्यावांचून नोकरीहि नाहीं कुणी देत."

"फाजील बडबड करूं नकोस. दोन वर्षांनीं खुशाल शाळेंत जा कुठल्याहि."

"साहेब, नका हो असं करूं. माझ्या आईकड तरी बघा. बाबा यंदा मॅट्रिक होईल, मग त्याला नोकरी लागेल, मग तो तुम्हाला चांगल्या चांगल्या साडया आणून देईल असं ती दररोज माझ्या बहिणींना सांगते."

"बाबा खोट्या तारखा करतो हें नाहीं वाटतं सांगत ती?" गोडबोले तिटकाऱ्यानें म्हणाले.

"माझी पहिलीच चूक आहे ही साहेब. एवढी माफ करा."

"पहिली चूक माफ केली कीं दुसरी चूक होऊं लागते."

"नाहीं, साहेब. देव पहिल्या चुकीबद्दल शिक्षा करीत नाहीं." दाराशीं व्हिक्टोरिया थांबली असें वाटून गोडबोले जागेवरून उठले व पाहूं लागले. त्यांचे भावी व्याही आठवले गाडींतून खालीं उतरत होते. गोडबोले घाईघाईनें जाऊं लागले. मुलानें केविलवाण्या दृष्टीनें त्यांच्याकडे पाहून म्हटलें, "साहेब, एकदां माफी करा. पहिलीच चूक— "

"कशाला मरायला आलास या वेळीं? रस्त्यावर जागा नाहीं वाटतं? थांब, आतां गड्याकडून धक्के मारवूनच तुला घालवून देतों."

शेवटचा आशातंतु तुटल्यामुळें जड पावलांनीं तो मुलगा तेथून निघून गेला. गोडबोले आठवल्यांना घेऊन वर आले. त्यांचे कपडे त्यांनीं स्वत: आपल्या हातानें खुंटीला लावले. "लीले, अग लीले, मामंजींना चहा घेऊन ये हं!" त्यांनीं मोठ्यानें ओरडून सांगितलें. त्यांच्या आवाजावरून त्यांचा आनंद व्यक्त होत होता.

हवापाण्याच्या गप्पा संपून बाळपणच्या आठवणींना सुरवात झाली. आठवले एखादी आठवण सांगत व गोडबोले खो खो करून हंसून तिचें स्वागत करीत. शाळेच्या कारकुनाप्रमाणें हुबेहुब अक्षर काढण्याच्या त्यांच्या शक्तीचा उल्लेख आठवल्यांनीं केला व ते पुढें कांहीं बोलणार तोंच लिली चहा घेऊन आली.

"लिली, मामंजींचे आभार मान हं तूं. एक पैदेखील न घेतां आय्. सी. एस्. नवरा देताहेत ते तुला."

लिलीनें लाजून मान खालीं घातली व टेबलावर चहाचे कप ठेवून ती निघून गेली. चहा घेतां घेतां आठवले म्हणाले, "मी हुंडा कां घेत नाहीं हें आलं कां तुझ्या लक्षांत ?"

"गेल्या सामाजिक परिषदेचा तूं अध्यक्षच होतास कीं ! तुझं तें भाषण वाचून मला धीर आला अन् म्हणून तर लिलीबद्दल मी शब्द टाकला."

"अरे परिषदेतलं भाषण परिषदेंत. तें कांहीं खरं कारण नाहीं. ओळख पाहूं खरं कारण !"

गोडबोल्यांनीं खूप डोकें खाजविलें: पण कांहीं केल्या त्यांचा तर्क चालेना.

"तूं नुसत्या शाळा तपासाव्यास, आणि इंग्लिश बरं, संस्कृत कच्चं, असले शेरे ठोकावेस. अरे गृहस्था, मी आय्. सी. एस्. झालों म्हणून माझा मुलगा आय्. सी. एस्. होऊं शकला. पण तूं नसतास तर मी तरी आय्. सी. एस्. कुठं होणार होतों ? माझं वय जास्ती नव्हतं का शाळेंत ? कारकुनासारखं हुबेहुब अक्षर काढून तूं माझ्या सर्टिफिकिटांतलं वय बदललंस म्हणून तर मी आय्. सी. एस्. झालों !"

गतस्मृतीच्या पुढें उभ्या राहिलेल्या भुताकडे गोडबोले भेदरलेल्या दृष्टीनें पाहूं लागले. मघाशीं गयावया करणाऱ्या मुलानें तरी अधिक काय केलें होतें ? आठवले घरचा श्रीमंत, अभ्यासांत हुषार. आय्. सी. एस्. व्हायला त्याला फक्त वयाची अडचण येणार हें आपल्या ध्यानांत येतांच आपण खऱ्याखोट्याचा विचार न करितां सर्टिफिकिटांत बदल करण्याचें धाडस केलें. मघांशीं आलेल्या मुलाएवढेच आपण त्या वेळीं होतों. त्याच्यासारखी आठवल्याची अन्नान्नदशा होती असेंहि नाहीं. घारीनें हार नेला तरी चालतो आणि चिमणीनें दाणा टिपला तर

चालत नाहीं, अशांतलें आपले वर्तन नाहीं का? परवां आपली लिली कांहीं एक कारण नसतां खोटें बोलली होती. तिला आपण क्षमा केलीच कीं नाहीं?

गोडबोले कांहींच बोलत नाहीं असें पाहून आठवले म्हणाले, "एवढा कांहीं पश्चात्ताप व्हायला नको तुला. काळाच्या प्रवाहांत सारंच वाहून जातं. या न्यायखात्यांत माझे केंस काळ्याचे पांढरे झाले. एक अनुभवाची गोष्ट सांगतों, गोडबोले. सूर्यालासुद्धां जशी छाया आहे, तसे माणसांत दोष हे असायचेच. कुठलाहि खटला आला तरी मी हें तत्त्व ध्यानांत ठेवतों. शिवाय तुझं तें मार्गदर्शक वाक्य तर माझ्या अंत:करणावर कोरल्यासारखं आहे अजून."

"माझं वाक्य?"

"हो तुझंच. सर्टिफिकिटांतील तारीख बदलतांना मी जेव्हां घाबरून तुला नको म्हणूं लागलों तेव्हां तूं म्हणालास, 'देव पहिल्या चुकीची नेहमीच क्षमा करतो.' माझ्यापुढं कुठलाहि खटला आला कीं पहिला गुन्हा असेल तर मी फार दयाळूपणानं वागतों याचं कारण हेंच आहे. देवानं जर माझ्या पहिल्या अपराधाची क्षमा केली आहे तर मी तरी इतरांना तशीच क्षमा कां करूं नये? ती सर्टिफिकिटाची लबाडी जर त्या वेळीं बाहेर पडली असती, तर शाळेंतून माझी हकालपट्टीच झाली असती. नी तसं झालं असतं म्हणजे मी निराळ्याच अर्थानं आय्. सी. एस्. झालों असतों. आय् म्हणजे मी क्लार्क सर्व्हिसमध्यें रखडत पडलों असतों." एवढें बोलून आठवल्यांनीं मोठ्यानें हंसायला सुरुवात केला. गोडबोल्यांच्यापुढें स्वत:च्या वाक्याचें दुसरें भूत उभें राहिलें. कांहीं तरी विचार मनांत येऊन ते जागेवरून उठले. इतक्यांत रस्त्या-

वर मोठा गलबला सुरू आहे असें वाटून ते दोघेहि खिडकींतून खालीं पाहूं लागले. " मोटारीखालीं घाल्डन घेतलंन् पोरानं ! ' प्रेक्षकांपैकीं कोणी तरी म्हणत होतें. थरथर कांपत गोडबोल्यांनीं खालीं पाहिलें. एका घटकेपूर्वी त्यांच्याकडे क्षमायाचना करणाऱ्या त्या बाळ-जीवाचा देह चेंदामेंदा होऊन रस्त्यावर पडला होता.

१९२९

# आरामखुर्ची

आरामखुर्चीत पडून कॉलेजांत दुपारीं शिकवायचा भाग मी वाचीत होतों. पुष्कळांना खरेंहि वाटणार नाहीं हें! कॉलेजांत शिकविण्याकरितां प्रोफेसर घरीं तयारी करतात ही गोष्ट गगनपुष्पाचें अत्तर हाताला लावून शशशृंगानें गृह शृंगारणाऱ्या वन्ध्यापुत्राइतकीच त्यांना खरी वाटायची! कॉलेजांतल्या कुठल्याशा मंडळांतल्या कवीनें तर प्रोफेसरांची संस्थानिकांशींच तुलना केली आहे म्हणे! 'प्रोफेसरचें कोष्टक' हा चुटका तर अलीकडील मुलांना मुखोद्गतच असतो अगदीं.

| | | |
|---|---|---|
| १२ पै | = | १ आणा |
| १६ आणे | = | १ रुपया |
| २ ते ४ रुपये | = | १ नोटांचें बाड |
| १० बाडें | = | १ लेक्चरर |
| १ लेक्चरर+वशिला | = | १ प्रोफेसर |

असलीं कोष्टकें विद्यार्थ्यांच्या जिव्हाग्रावर नाचत असतांना घरीं 'Quality Street' सारख्या सोप्या नाटकामधें मी डोकें खुपसून बसलों होतों या गोष्टीवर त्यांचा विश्वास बसणार तरी कसा?

उच्च दर्जाची आनंदप्रधान नाटिका, गुदगुल्या करणारा विनोद,

चटकदार उपरोध, सुंदर टीका इत्यादि शब्दांचा सांठा माझ्यापाशीं भरपूर होता. पण माझी खरी अडचण होती निराळीच. " It is not the flaunting flower men love, it is the modest violet" या वाक्यापाशीं वर्गांत माझ्या वक्तृत्वाचें घोडें पेंड खाणार यांत शंका नव्हती. मुग्ध उन्मादावस्थेंत असलेल्या सतरा अठरा वर्षांच्या विद्यार्थ्यांना हें तत्त्व पटवायचें कसें? आणि तसेंच पाहिलें तर तें मला तरी कुठें पटलें होतें? माझे दोन हात अद्यापि व्याजीं लागले नसल्यामुळें स्वत:च्या उदाहरणाचा इथें काहींच उपयोग नव्हता. पण माझ्या भोंवतालचें जग? त्यांत स्त्रीच्या गुणाची कदर झालेली कुठें दिसून येत होती? मुलगी पहायला गेलेले बहुतेक लोक सासऱ्याचें डबोलें पाहूनच परत आले नव्हते का? सासऱ्यानें कोणत्या कंपनीची तिजोरी विकत घेतली आहे, अगर कोणत्या बँकेशीं त्याचा पत्रव्यवहार आहे, या गोष्टीच अनेक भावी जांवयांना महत्त्वाच्या वाटतात. बँका व तिजोऱ्या यांच्याकडे त्यांचें लक्ष जाण्याचें कारण स्वदेशांतील उद्योगधंद्याविषयीं त्यांना वाटणारी कळकळ हेंहि असण्याचा संभव आहे! कांहीं जांवई तिजोरीऐवजीं मुलगी पाहतात! नाहीं असं नाहीं. पण अशा वेळीं त्यांच्या अंगांत रॅफेलपासून रविवर्म्यापर्यंतचे सर्व चित्रकार एकदम संचारतात. संसाराचित्राला हवें असें सुंदर मॉडेल मिळालें तरच ते बोहल्याच्या पायऱ्या चढतील. अशा स्थितींत पुरुष बाह्यरंगावर भुलत नाहींत असें म्हणण्यांत काय अर्थ आहे! सीतेपासून सिंधूपर्यंत एक तरी नायिका कुरूप आहे का? "It is not the flaunting flower men love, it is the modest violet हें सुभाषित ऐकायला ठीक आहे. पण सुभाषितें म्हणजे काय? कल्पनेचे मधुर आलाप!

मी आरामखुर्चीतून उठून येरझारा घालूं लागलों. मनाला कसें

गुदमरल्यासारखें झालें अगदीं. सुभाषितांचें जग किती उदात्त! पण या जगांत अनुभवाची हवा नसली तर जगायचें कसें? माझ्या माहितींतलीं किती तरी माणसें मनाच्या पडद्यावर नाचून गेलीं. पण सारीं विरुद्ध साक्ष देणारीं. आज वर्गांत हें वाक्य शिकवितांना काय लटपटपंची करावी? माझा मलाच राग आला. शिक्षण ही अमृताची धार असायला नको का? पण मी तर मृगजळाचा सागर निर्माण करून—अमलें फसवें शिक्षण देण्यापेक्षां....

मी पुढें काय प्रतिज्ञा केली असती तें माझें मलाच कळत नाहीं. कदाचित् राजीनामा द्यावा असें मी म्हटलें असतें. कदाचित् कडकडीत चहा पिऊन त्रस्त मनाचें सांत्वन करण्याचा उपायहि मला सुचला असता.

दारावर टकटक आवाज झाला. दार उघडून पाहतो तों कॉलेजचा शिपाई! प्रिन्सिपॉलसाहेबांचें जरुरीचें पत्र घेऊन आला होता तो. पत्रांत एवढाच मजकूर होता—

"कलकत्त्याला श्री. सरदेसाई यांना संस्थेतर्फे भेटण्याकरितां तुम्हांला ताबडतोब निघायला हवें. जाण्याची तयारी करून मला भेटा."

सरदेसाई?

कलकत्त्याला कोण सरदेसाई आहेत? आणि संस्थेचें त्यांच्याकडे काय काम आहे?

जागृत झालेल्या स्मृतीनें हालचाल केली. तो गुणवंत सरदेसाई तर नसेल ना? बी. ए. च्या वेळीं माझ्या शेजारच्याच खोलींत राहत असे स्वारी. नेहमीं आरामखुर्चींत पडलेली असायची! साऱ्या रेसिडेन्सींत 'ईझिचेअर' म्हणत असत त्याला. या आरामखुर्चीकडे कशाला जायचें?

बेट्याला एखादा सोडनीत दहापांच लाख रुपये तर मिळाले नाहींत ना?

हालचाल करणाऱ्या स्मृतीनें डोळे उघडले.

बी. ए. ची परीक्षा झाल्यावर वडिलांच्या एका श्रीमंत स्नेह्यांच्या सुंदर आणि सुशिक्षित मुलीशीं लग्न करणार होता तो. तो फोटो! मीना त्या मुलीचं नांव! त्याला सासऱ्याचें घबाडच मिळालें असेल बहुधा. त्या मुलीची एक गरीब मावसबहीणहि आहे असें बोलून गेला होता तो एकदां. 'त्या गरीब मुलीशींच लग्न कर कीं मग!' असें त्या वेळीं मी थट्टेनें म्हणालो आणि सरदेसायानें एवढाले डोळे केले....

माझी स्मृती गुणगुणूं लागली,

"It is not the flaunting flower men love; it is the modest violet." मला हंसूं आलें. वाटलें बॅरीला कलकत्त्याला न्यावें, सरदेसायासमोर उभें करावें आणि म्हणावें, "सांग आतां तुझ्या या वाक्याचा अर्थ."

  

प्रवासांत मन कसें वावडीसारखें वाऱ्यावर फिरत असतें. मधेंच तें गतकाळांत भटकूं लागतें, मधेंच भविष्यकाळाकडे झुकतें. सरदेसायासारख्या माजी विद्यार्थ्यानें लाख रुपये वडिलांच्या नांवानें देणगीदाखल देण्याचा संकल्प जाहीर केला म्हणून संस्था मला त्याच्याकडे पाठवीत होती. पण ज्या गृहस्थानें कॉलेज सुटल्यावर मला साधी लग्नपत्रिका सुद्धां पाठविली नाहीं, तो पूर्वीची ओळख आठवून आतां माझ्या हातावर लाखाचं उदक सोडील ही आशा बाळगण्यांत काय अर्थ होता? पण सार्वजनिक संस्था म्हटली कीं तिचें तत्वज्ञान आलेंच! धोंडे मारा; आंबे पडोत, नाहीं तर न पडोत. यावेळीं तरी धोंडे मारून

पुन्हा तेच पदरांत ध्यायचे काम करावें लागणार याविषयीं मला शंका नव्हती.

निघतांना पुण्याहूनच तार केली होती त्याला! पण श्रीमंत सासऱ्याचा जांवई आणि एक लाखाची देणगी देणारा धनिक, विद्यार्थि दशेंतील ओळख आठवून आपल्या मित्राकरितां स्टेशनावर येईल ही गोष्ट कांहीं शक्यतेच्या कोटींतली नव्हती. त्याच्या घरीं उतरायला जावें कीं न जावें या विचारांत पडलों मी स्टेशनावर. हो, श्रीमंतांचीं मनें असतात फार नाजुक! एखाद्या लवंगी शब्दानें सुद्धां त्यांना उष्णता होते. बाहेर कुठें उतरलों तर तेवढ्यासाठींच हा लक्षाधीश रागावून बसेल आणि आपल्याला हात हालवीत परत जावें लागेल, असा पोक्त विचार करून मी शेवटीं त्याच्या बंगल्याची वाट धरली.

भीत भीत मी बंगल्याच्या पायऱ्या चढूं लागलों. पण मला पहातांच एक नोकर सामानाकरितां लगबगीनें पुढें आला. पायऱ्या चढून जातांच दारांत एका हंसतमुख तरुण स्त्रीनें नमस्कार करून म्हटलें, 'या भाउजी.'

आतां मात्र मी बुचकळ्यांत पडलों. भाऊजी घरीं आले, पण बंधुराज कुठें पळाले याचा पत्ता लागेना. वहिनींच्याकडे पाहिलें तों रूप दहाजणींसारखें. गुणवंत आपल्या भावी वधूचें जें वर्णन करी, तिचा जो फोटो त्याच्यापाशीं होता—काव्यें आणि कादंबऱ्या जाळून त्यांची तीट तिला लावावी असें म्हणण्यापर्यंतहि त्याची मजल गेली होती एकदां—त्या फोटाचा आणि खऱ्याखुऱ्या वहिनींचा कांहींच मेळ बसेना. मनांत नाना प्रकारचे विचार येऊं लागले. एकदा वाटलें—ही दुसरी बायको असेल गुणवंताची! नंतर विचार सुचला—एखादें जिवावरलें दुखणें गेल्यामुळें गुणवंताच्या बायकोचें रूप तर बदललें नाहीं ना?

पण या विचाराचें माझें मलाच हंसूं आलें. सोनचाफें बावलें म्हणून तें काय कण्हेरीसारखें दिसेल ?

वहिनी मला दिवाणखान्यांत बसवून चहा आणण्याकरितां गेल्या. तेवढ्यांत मी सर्व वस्तु पाहून घेतल्या. गुणवंत व्यापारांत पडला असला तरी त्याचें हृदय कवीचें आहे हें बोलून दाखविणाऱ्या किती तरी सुंदर वस्तु तिथं होत्या. दिवाणखान्यांत पसरलेल्या गालि-चाचा रंग आणि फुलदाणींतील फुलांचा रंग यांच्यांतली संगति किती सुंदर दिसत होती ! समोरासमोर लावलेली ' क्रौंचवध ' आणि ' सीता-त्याग ' हीं दोन चित्रें पाहतांच माझ्या मनांत विचारांचे कल्लोळ उठले. व्याधानें पक्ष्यांच्या जोडप्यापैकीं एकाचा वध करतांच ज्या वाल्मीकीचा सात्त्विक संताप जागृत झाला, त्याच्यावरच रामानें टाकलेल्या सीतेचें करुणचित्र रंगविण्याची पाळी आली ! दिवाणखान्यांतील वस्तु नि वस्तु गुणवंताच्या सौंदर्यदृष्टीची साक्ष देत होती. पण—चहा घेऊन येणाऱ्या वहिनीकडे पाहतांच मला गुणवंताचें आश्चर्य वाटूं लागलें.

" तुम्ही कशाला आणलांत चहा ?"

" चहाची नदी नाहीं कांहीं आमच्या घरांत ! कीं आपला तो आपोआप वाहत येईल—"

" पण नोकरचाकर—"

" तुम्ही आमचे पाहुणे ! नोकराचाकरांचे नाहीं." चहा ओतण्या-करितां त्यांनीं आपली मान खालीं केली. मघांचें धीटपणाचें स्वागत, आतांचें हें बोलणें—माझी खात्रीच झाली. ज्या सुशिक्षित, सुंदर आणि श्रीमंत मुलीशीं गुणवंत लग्न करणार होता ती हीच. आतां तिचें रूप—

मी वहिनींना विचारलें, " क्वालिटी स्ट्रीट वाचलयंत् कां ?"

'कुठला स्ट्रीट हा ? आमच्या कलकत्त्यांत रस्ते फार आहेत हं ! सराईत माणसाला सुद्धां चुकायला होतं एखाद्या वेळीं.'

'मी म्हणतों तें नाटक आहे. कॉलेजच्या पहिल्या वर्षाला लावलंय् आमच्याकडं.'

वहिनी खो खो हंसूं लागल्या. पण माझा भांबावलेला चेहेरा पाहतांच त्या म्हणाल्या, 'कागदाची होडी समुद्रांत सोडली तर काय होईल भाऊजी ?' काय होईल हें सांगायला इंग्लिशचा प्रोफेसर असलेला भाऊजी कशाला हवा होता ? मी कांहींच बोलत नाहीं असें पाहून वहिनी म्हणाल्या, 'त्या होडीसारखंच आहे माझं इंग्रजी !'

पुढें काय बोलायचें तेंच मला कळेना. सारेंच चमत्कारिक दिसत होतें. एखाद्या आरामखुर्चीत अंग टाकून प्रवासांत आलेला शीण घालवावा म्हणून मी दिवाणखान्यांत इकडे तिकडे पाहूं लागलों. पण मला आरामखुर्ची कुठेंच दिसेना ! "काय हवंय् भाऊजी ?'

'आरामखुर्ची.'

'औषधालासुद्धां मिळायची नाहीं आमच्या इथं.'

'म्हणजे ?'

'अगदीं बहिष्कार घातला आहे आरामखुर्चीवर त्यांनीं !'

'तो कां ?'

'स्वदेशीसाठीं असेल !'

मला हंसूं आवरेना.

'हंसायला काय झालं इतकं ?'

'कॉलेजांत ही स्वारी सदानूकदा आरामखुर्चीत पडलेली असायची ! त्या वेळचं त्याचं पुढल्या आयुष्याविषयींचं आवडतं स्वप्न सांगूं का तुम्हाला ?'

'हं'

'संध्याकाळच्या वेळीं बागेंत दोन आरामखुर्च्या टाकल्या आहेत, टेबलावर लज्जतदार चहा आहे, ती एकादी गोड कविता गोड गळ्यानं म्हणत आहे–'

'पुरे, पुरे भाऊजी!'

'कां?'

'स्वप्नं कधीं खरीं झालीं आहेत कां?'

बॅरीच्या त्या ओळी आठवून माझ्या मनांत आलें- कविकल्पना हेंहि एक स्वप्नच नाहीं का?

निकडीच्या कामामुळें गुणवंताला एकाएकीं बाहेर जावें लागलें होतें. पण मी त्याचा बालमित्र आहे अशी वहिनींची समजूत होण्या-सारखं कांहीं तरी तो त्यांच्यापाशीं बोलला होता खास. लग्नपत्रिका पाठवायला विसरणारा हा सद्गृहस्थ इतका प्रेमळ आहे असें दुसऱ्या कुणी सांगितलें असतें तर मी त्याच्यावर मुळींच विश्वास ठेवला नसता. पण दुसऱ्याच्या डोक्यावर नसेल इतका माणसाचा स्वत:च्या डोळ्या-वर विश्वास बसतो. गुणवंताला धंद्याच्या निमित्तानें वारंवार परगांवीं जावें लागे. त्यामुळें पाहुण्यांचें स्वागताचें काम वहिनींच्याकडेच येई. त्या या कामांत किती प्रवीण झाल्या होत्या याचा अनुभव मी येतां-क्षणींच घेतला. कलकत्त्यासारख्या परमुलुखांत राहणाऱ्या श्रीमंत व्यापा-ऱ्याची बायको चलाख असावी यांत नवल नव्हतें. पण तिचें रूप दहाजणींसारखेंच होतें हें आश्चर्य नव्हे का?

या आश्चर्याचा विचार करितां करितां कॉलेजांत असतांना गुण-वंताच्या पुस्तकांत सांपडलेला त्याच्या भावी वधूचा फोटो मला आठ-वला. बंगल्यापुढील कारंजापाशीं आरामखुर्चीत पडून कादंबरी वाचीत

होती ती. त्या फोटोंतील मुलीशीं वहिनींचें कांहीं साम्य होतें म्हणावें तर–माझ्या स्मृतीनें लगेच निषेधार्थक ठरावच पास केला असता.

गुणवंत आल्याखेरीज या कोड्याचा उलगडा होणें शक्य नव्हतें. तो येतांच कॉलेजांतल्या आठवणींना उजाळा मिळाला. अगदीं अरेतुरे म्हणून आम्हीं बोलूं लागलों. या संधीचा फायदा घेऊन मी म्हटलें, ‘बाकी जस्साचा तस्सा राहिलायस् तूं. पण एक मात्र—’

आपलें हंसूं दाबीत त्यानें विचारलें, ‘एक काय ?’

‘एका गोष्टींत अगदीं उलथापालथ होऊन गेली आहे.’

‘कुठली गोष्ट ती ?’

‘आरामखुर्ची !’

क्षणभर समोरील चित्राकडे पाहून तो गंभीरपणानें म्हणाला, ‘झालंय खरं तसं–कॉलेजांत असतांना मला वाटे–साऱ्या जगांतलं सुख आरामखुर्चीत भरलंय्. वाचायला, सृष्टीची शोभा पहायला, आयुष्यांतला खराखुरा आनंद चाखायला, आरामखुर्चीसारखी जागा नाहीं दुसरी. तुला तो फोटो आठवतो का ? माझ्या पुस्तकांत तो दिसतांच साऱ्या पोरांनीं रेसिडेन्सी डोक्यावर घेतली होती अगदीं !’

‘त्यांचा तरी काय दोष ? तूं एका माणसाला डोक्यावर घेतलं होतंस. त्यांनीं—’

तो हंसत हंसत म्हणाला, ‘पण मागून माझं डोकं फिरलं ना ? तें नुसतं फिरलं नाहीं हं ! पृथ्वी जशी सूर्याभोंवतीं फिरते—’

‘ह्या सूर्यानं तुझी आरामखुर्ची जाळून टाकली वाटतं ?’

‘तसं म्हण हवं तर. दरवर्षी एखादा दिवस मी तिच्या वडिलांच्या घरीं रहायला जात होतों. तेवढ्यांत ती अशी चमकत असे ! नव्या कादंबरीची माहिती, नाटकांतलीं नवीं नवीं गाणीं, शृंगाराच्या नव्या

नव्या तऱ्हा—गंधर्वनगरींतच असल्याचा भास होई मला. तिचा तो आरामखुर्चीतला फोटो त्या वेळींच पैदा केला मी!"

तो क्षणभर थांबला. त्याच्याकडे पाहण्याचें टाळण्याकरितां मी भिंतीवरील चित्राकडे नजर टाकिली. दुष्यंत आणि शकुंतला यांच्या पहिल्या भेटीचें चित्र होते तें! माझ्या मनांत विचार आला—दुष्यंत खूप दिवस आश्रमांत राहिला असता तर त्याला अधिक कोण आवडूं लागली असती? शकुंतला कीं अनूसया?

मी पाहत असलेल्या चित्राकडे गुणवंतानें पाहिलं. किंचित् स्मित करून तो म्हणाला, "बी. ए. झाल्यानंतर तिच्या वडिलांनीं मला बोलावलं. पहिल्या दिवशीं मीनाबरोबर हंसतां-खेळतांना स्वर्ग अगदीं दोन बोटं राहिला असं मला वाटलं. स्वर्गाच्या दारांत उभं राहून मी पृथ्वीकडे पाहिलं. कुठं माझी प्रेमदेवता आणि कुठं तिची ती मृत्यु लोकांतली मावस-बहीण! दोघींत जमीन-अस्मानाचं अंतर होतं."

माझ्या चेहऱ्यावरील कुतूहल पाहून तो म्हणाला, "पण आकाश हा आभास नाहीं कां? जमीन खरीखुरी, साऱ्या जीवांना आधार देणारी—जाऊं दे तें. काय घडलं तेंच तुला सांगतों. आठ-पंधरा दिवसांत मला जें दिसलं—माझ्या भावी पत्नीला बागेंत आराम-खुर्ची टाकून कादंबऱ्या वाचीत बसण्याची भारी हौस होती. पण तापाच्या सांथीनं माळी आजारी पडल्याबरोबर कुंड्यांतलीं फुलझाडं सुकूं लागलीं. तापाला आणि माळ्याला शिव्या देण्यांत मीनानें मुळींच कसूर केली नाहीं. पण झारी घेऊन पाणी शिंपायला मात्र कांहीं केल्या तयार होईना ती! तीनचार दिवसांनीं झाडं पुनः टवटवीत दिसूं लागलीं. माळी तर आजारीच होता. पाणी कोण घालतं हें जेव्हां मी पाहिलं—घरच्या धबडग्यामुळें जिला मान वर करायला फुर-

सद मिळत नव्हती ती मीनाची मावसबहीण विमल त्या फुलझाडांना जगवीत होती.

असल्या तीनचार अनुभवांनीं माझ्या डोळ्यांत अंजन घातलें. पण ते पुरे उघडले तो प्रसंग ! मीहि त्या तापाच्या सांथींत सांपडलों. एकशेंपांचापर्यंत ताप ! अर्धवट भ्रमांत सुद्धां असायचा मी केव्हां केव्हां ! कुठलेसे संस्थानिक हवेकरितां तिथें आले होते त्या वेळीं. त्यांच्याकडले रात्रीच्या जलशाचें आग्रहाचें आमंत्रण आलें आमच्या घरीं. संध्याकाळीं चारपांच वाजल्यापासून माझ्या प्रेमदेवतेची गडबड सुरू झाली. हा शालू नेसावा कीं तें जरीचें लुगडें बरें दिसतें ? त्या लुगड्याला कुठला ब्लाउज शोभतो ? वेणी पाठीवर सोडावी कीं पिळाचा अंबाडा बांधावा ? पलीकडच्या खोलींतले तिचे हे प्रश्न आणि तिच्या मावसबहिणीचीं तुटक उत्तरें मला मधून मधून ऐकूं येत होती. ‘ तूं काय नेसणार ? ’ या मीनाच्या प्रश्नाला तिनें उत्तर दिलें. ‘ नेसेन कांहींतरी ! ’ तिच्या या उत्तरानें माझी प्रेमदेवता खास रागावली असावी.

संध्याकाळीं ताप चढूं लागला. थोड्या वेळानें मला कांहीं समजेनासें झालें. मी शुद्धीवर आलों तेव्हां मध्यरात्र झाली असावी. माझ्या डोक्यावर कोलनवॉटर घालतांना कांकणांचा आवाज झाला. मी डोळे उघडण्याचा प्रयत्न केला. पण ते अगदीं जड झाले होते. संस्थानिकाकडील जलशाची मला आठवण झाली. तो मोह दूर झुगारून माझ्या शुश्रूषेकरितां येऊन बसणाऱ्या मुलीचें हृदय किती प्रेमळ असलें पाहिजे ? वडिलांच्या स्नेह्याची मुलगी म्हणून नव्हे तर प्रेमळ तरुणी म्हणून....

घडीवर कोलन-वॉटर घालणाऱ्या हाताला स्पर्श करण्याचा मोह मला आवरेना. मोठ्या कष्टानें मी आपला हात वर उचलला. कांकणें

पुन्हां वाजलीं. तिनें चटकन आपला हात मागें घेतला असावा ! मी कांहीं तरी बोलणार होतों. पण डोळ्यांवर अशी झांपड आली होती कीं माझ्या तोंडांतून शब्दसुद्धां उमटला नाहीं.

दुसरे दिवशी सकाळीं मी मीनाला म्हटलें, " कसा काय झाला रात्रीचा जलसा ? "

" छान ! आरामखुर्चीत पडून डुलकी घेत घेत गाणं ऐकणं कांहीं वाईट नाहीं फारसं."

" त्यापेक्षां घरी येऊन निजलेलं काय वाईट ? "

' संस्थानिकांना काय वाटलं असतं हें नको कां बघायला ? नाहीं तर आमची विमा ! डोकं दुखतं म्हणून आली कीं लगेच तिथून उठून ! राणीसाहेबांशीं ओळख झाली असती तर त्यांनी नवरा तरी पाहून दिला असता चांगला ! "

चहा घेऊन दिवाणखान्यांत येणाऱ्या वहिनी म्हणाल्या, ' राणी-साहेबांच्या ओळखीशिवायच—'

' कोलन-वॉटर नव्हतं तें गुणवंत ! जादूनं मंतरलेलें पाणीच असावं तें ! ' मी म्हणालों.

मी हंसत हंसत वहिनींच्याकडे पाहिलें. त्यांच्या डोळ्यांतल्या पाण्यांत जादू होती खरीच !

१९३५

# इरलें, रेनकोट व सनातनधर्म

'श--श्'

साधा आवाज ! व्याकरणाच्या दृष्टीनें नुसतीं व्यंजनें ! पण या साध्या आवाजानें चंडीरामपंतांच्या अंगावर भरपूर मांस आलें. महिनाभर सुग्रास अन्न खाऊनसुद्धां एवढी मांसाची मिळकत त्यांना सहसा होत नसे. अन्न हें साधें औषध पण स्तुति हें इंजेक्शन आहे, असें कुणी म्हटलेंच आहे ना ?

या मूठभर मांसाचा इतिहास असा घडला. बेळगांवला 'आर्यसंस्कृती' वर प्रवचनें देण्याकरितां चंडीराम दांडेकरांना तेथील सनातनी धर्मबांधवांचें आमंत्रण आलें. पावसाळ्याचे दिवस ! जावें कीं न जावें हा पंतांना विचार पडला. उत्तर ध्रुवावरून थंडीवाऱ्यांतून हिंदुस्थानांत आलेले आर्यपूर्वज आणि बेळगांवला मिळणारी बिदागी त्यांच्या डोळ्यांपुढें उभी राहिली. त्यांच्या मनांत आलें—पाऊस पाऊस तो काय ? आर्यऋषि बर्फमय प्रदेशांत उषःसूक्तें गात झाले; मग पावसाबरोबर आपण प्रवचनें झोडलीं तर योग्यच होईल. पावसाची तरी काय एवढी बिशाद ? एक छानसा रेनकोट घेतला म्हणजे झालें !

चंडीरामपंत रेनकोट घेण्याकरितां गिरगांवांतल्या दुकानांत गेले. दुकानदार आपल्याला बी. ए. झालेले सनातनी प्रवचनकार म्हणून ओळखीत आहे हें पाहतांच त्यांना—विशेषतः त्याच्या उजव्या हाताला व पैशाच्या पाकिटाला फार आनंद झाला. पण फार वेळ टिकायला आनंद म्हणजे कांहीं नॉर्वे देशांतली भाकरी नव्हे ! आधींच सारे दुकानदार चोर ! त्यांतून हा तर ओळखीचा पडला ! नाइलाजानें चंडिरामांनीं आपली दृष्टि देशी रेनकोटांवरून जपानी रेनकोटाकडे वळविली. दुकानदार चपापला. प्रवचनांतून सनातनधर्म, आर्यभूमि आणि आर्यसंस्कृति यांची स्तुतिस्तोत्रें गाणारे पंत जपानी रेनकोट घेतात ? अधिक मिळणारा फायदा बुडत असल्यामुळें असो अगर देशी मालावरल्या प्रेमामुळें असो, दुकानदार खिन्न स्वरानें उद्गारला,'जपानी माल आहे तो शास्त्रीबुवा !'

'पण जपानी लोक आर्यवंशांतलेच कीं !'

तीनचार रुपये वांचल्याच्या आनंदांत पंत अगदीं गढून गेले होते. आनंदाच्या वेळीं मनुष्य वसुधैवकुटंबक वृत्तीचा होतो. मग जपान व हिंदुस्थान तर काय ? एकाच आशिया खंडांतले देश !

  

**अ**सा आपला ऐतिहासिक आर्य रेनकोट आगगाडींतल्या बांकावर ठेवून जवळची जागाहि पदरांत पाडण्याच्या प्रयत्नांत चंडीरामपंत होते. ईश्वरकृपेनें त्यांत त्यांना यशहि मिळालें. इतक्यांत प्लॅटफॉर्मवरून त्यांच्या कानांवर 'श्-श्' असा आवाज झाला. त्यांनीं चटकन् मान वळवून पाहिलें. पंतांकडे बोट करून एक तरुण आपल्या समवयस्क सोबत्याला कांहींतरी सांगत होता.प्रसिद्धीच्या शिडीची पहिली पायरी आपण चढलों

अशी पंतांची पक्की खात्री झाली. हो, लोकांनीं उंच केलेल्या हातांचीं बोटें आणि त्यांचीं डोकीं यांच्यांत असें काय अंतर असतें ? सनातनी चंडीरामपंतांनीं क्षणांत शेखमहंमदाला गुरु केलें. बेळगांवला प्रवचनें झालीं कीं आपणाला कोंकणांतून आमंत्रणें येतील ! फणस-आंब्यांचे दिवस नसतांनाहि मुसळधार पावसांत आपण कोंकणांत जाऊं ! हो, आपला रेनकोट आहेच म्हणा आपल्याबरोबर ! आपली ही धर्मनिष्ठा पाहून कुठला तरी एखादा शंकराचार्य आपल्याला 'सनातनसंस्कृति-संरक्षक' अशी पदवी देईल. मग काय ? युरोपची यात्रा ! विवेकानंदांनीं अमेरिकेंत जसा हिंदुधर्माचा ध्वज फडकाविला त्याप्रमाणें आपणहि—

काय योगायोग पहा ! पंडित चंडीराम दांडेकरांनीं मनांतल्या मनांत ती प्रतिज्ञा उच्चारायला सुरुवात केली तोंच मांजर आडवें गेलें. मांजर म्हणजे तसें कांहीं मांजर नव्हे; आणि आडवें म्हणजे अगदींच आडवें नव्हे. चंडीरामांनी आपल्या सनातन कल्पनाकोशांत स्त्री म्हणजे मांजर असा अर्थ ठरवून ठेवला होता. आपल्या प्रवचनांतून ते या नावीन्यपूर्ण उपमेचा विस्तारहि करीत असत. मांजरें व स्त्रिया दोन्ही चुलीभोंवतींच आढळतात; दोघांनाहि ऊब आवडते ! चतुष्पादांना अग्नीची व द्विपादांना पैशाची. दोन मांजरांचें काय अगर बायकांचें काय क्वचित्‌च पटतें. मांजर स्वस्थ बसलें असतांना 'घुर, घुर' असा आवाज करतें. स्त्रियांचीहि नेहमीं अशीच कुरकुर चालते. मांजरांना कसेंहि टाका, तीं आपल्या पायांवरच पडतात. स्त्रियांचेंहि तसेंच आहे. मांजराला नऊ प्राण असतात असें इंग्रज म्हणतात. बायकांनाहि ते असतात हें आमच्या सनातन धर्माला फार पूर्वीपासून ठाऊक आहे; नाहींतर त्यानें बायकांना मरेमरेतों मारण्याची

परवानगी पतिदेवांना दिलीच नसती—इत्यादि इत्यादि....!

मात्र आतां आडवें गेलेलें मांजर कांहीं साधें नव्हतें! प्रवचनांत त्या पोरीचा उल्लेख करायचा असता तर चंडीरामपंतांनीं तिला इराणी मांजरच म्हटलें असतें. इराण आशियाखंडांत असल्यामुळें त्यांची ही उपमा अस्सल आर्य ठरायला कोणताच प्रत्यवाय नव्हता.

पंतांच्या पलीकडचाच डबा दुसऱ्या वर्गाचा होता. हमाल व त्याच्यामागून आलेले एक म्हातारेबोवा त्या डब्यांत सामान चढवूं लागले. त्या दोघांच्यामध्यें उभ्या असलेल्या तरुणीनें चटकन् उजवा हात उचलून डोळ्यांवर आलेल्या केंसांच्या बटा मागें केल्या. 'मार्जार-महा-काव्या'चे जनक या दृष्टीनें पंतांना मांजरी पंजानें आपल्या मिशा साफसूफ करते त्या गोष्टीची यावेळीं आठवण व्हायला पाहिजे होती. पण पानांच्या रंगाचा पोषाख असलेला हमाल व दुसरीकडे प्रत्यक्ष पिकलें पान असलेले म्हातारेबुवा दिसत असल्यामुळेंच कीं काय त्यांना जो चरण स्फुरला तो शाकुंतलांतला—

"मध्ये तपोधनानां किसलयमिव पांडुपत्राणाम्!"

पंत त्या 'किसलया'कडे म्हणा अगर मांजराकडे म्हणा, अनिमिष दृष्टीनें पाहूं लागले. त्यांचें एक मन म्हणालें, 'हें बरें नव्हे—ती परस्त्री आहे.' दुसऱ्यानें सल्ला दिला, 'छेः, ती कदाचित् तुझी लांबची आते-मामे-मावस-बहीण असेलहि! जन्मांत न पाहिलेलीं माणसं प्रवासांत भेटतात. तसं नसतं तर जगांतल्या निम्म्या कादंबऱ्यांचीं कथानकं अपूर्णच राहिलीं असतीं. समज, ही मुलगी तुझ्या नात्यांतली आहे. मग तिच्याकडे तूं पाठ करणं बरं दिसेल का?' दुसऱ्या मनाची ती कैफियत कांहीं पहिल्या मनाला पटली नाहीं. दोन्ही मनांचें कडाक्याचें भांडण सुरू झालें. दोघांच्या भांडणांत तिसऱ्याचा लाभ

व्हायचा हें ठरलेलेंच आहे. तो पंतांच्या डोळ्यांना झाला! तें कालि-दासी किसलयहि किंचित् तिरपेंच उभें होतें. असलें अर्धवट पाहणें पंतांना कांहीं मनापासून पसंत नव्हतें. पण करतात काय बिचारे? डब्यांतून खालीं उतरावें तर ती शकुंतला अजिबात पाठ फिरवून उभी रहायची! तेव्हां आहेच कीं जुनें सुभाषित—"सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः!"

थोड्याच वेळांत पिकलें पान कोवळ्या कळीसह सेकंडक्लासच्या डब्यांत अदृश्य झालें. चंडीरामांना वाटलें—लांकडांतून आरपार पाहण्याचा शोध अजून कसा नाहीं निघाला? हळुहळू गाडींत माणसांची आणि आकाशांत ढगांची गर्दी होऊं लागली. त्यांनीं बाहेर पाहिलें. पाऊस पडूं लागला होता. कोंडाणा परत घ्यायच्या वेळीं जिजाबाईंनीं तानाजीकडे ज्या दृष्टीनें पाहिलें असेल, त्या नजरेनें त्यांनीं आपल्या रेनकोटाचें निरीक्षण केलें. तो नवा असल्यामुळें पंतांच्या सोंवळ्या नाकाला न सोसणारा थोडासा वास त्याला येत होता. पण त्यांनीं पोक्त विचार केला. पावसामुळें घाटांतला एखादा बोगदा थोडासा नादुरुस्त झाला आणि मधल्या एखाद्या स्टेशनावर चार दोन तास खोटी झाली, तर हा कोरा करकरीत कोट चढवूनच आपण त्या किसलयाच्या दृष्टीला पडूं. आपण जुन्याचे अभिमानी असलों तरी अगदीं गबाळग्रंथी दिसणें कांहीं बरें नाहीं.

रेनकोटानें जागा अडवून ठेवणाऱ्या चंडीरामपंतांना आपल्यापलीकडेच एक तान्हें मूल घेऊन उभी असलेली बाई जरी दिसली नाहीं तरी ते दूरदर्शी होते यांत संशय नाहीं. घाटांतल्या कुठल्याशा स्टेशनावर गाडी आली आणि पुढचा रस्ता तीन तास बंद आहे असें कळलें. डब्यांतल्या उतारूंनीं पावसाला शिव्या द्यायला सुरुवात केली.

पंतांना त्यांच्या अज्ञानाची कींव आली. प्रवचनाचा समय असता तर ते सिंहगर्जना करून म्हणाले असते, "नादान नास्तिकांनो, ज्या वरुण देवतेचीं स्तोत्रें तुमच्या पूज्य पूर्वजांनीं गायिलीं, तिची नाहक निंदा करणाऱ्या तुमच्या जिभा झडून जातील झडून !" पण डब्यांतील धर्म-भ्रष्ट लोकांचा राग त्यांना आंतल्याआंत गिळावा लागला. तो पचविण्या-करितांच कीं काय ते ताडकन् जागेवरून उठले व रेनकोट चढवून बाहेर पडले. पावसाची बुरबूर चालू होतीच. पण प्रथमतःच अंगावर चढविलेल्या ह्या रेनकोटाच्या ऐटींत मुसळधार पावसाला देखील त्यांनीं तोंड दिलें असतें. बाहेर पडतांच त्यांची पावलें सेकंड-क्लासच्या डब्याकडे वळलीं. एखाद्या मानसशास्त्रज्ञानें मघांच्या मुलीला पाहण्याकरितां ते तिकडे गेले असें तर्कट यावर रचलें असतें. पण त्यांच्या मनांतला खरा हेतु निराळाच होता. त्या मुलीबरोबरच्या म्हातारेबोवाशीं वेदां-ताची चर्चा करणें शक्य असलें तर हा मधला कंटाळवाणा वेळ लवकर जाईल असें त्यांना वाटलें.

आणि नास्तिकाची सुद्धां तेहतीस कोटी देवांवर श्रद्धा बसावी असा अनुभव त्यांना आला. म्हातारेबुवा पिंक टाकण्याकरितां खिडकीं-तून बाहेर डोकावत होते. त्यांचें लक्ष पंतांकडे जातांच ते बोबड्या स्वरानें ह्मणाले, 'या, या, चंडिलामपंत ! अग कुसा, केवल्हा अलभ्य लाभ झाला हा !'

गाडी चालत नसतांना तिसऱ्या वर्गाच्या उतारूनें दुसऱ्या वर्गांत बसणें हा कांहीं गुन्हा होत नाहीं, असा सूक्ष्म धर्मविचार करून पंत डब्यांत शिरले. म्हातारेबुवांना नमस्कार करून बसत बसत ते ह्मणाले, 'आपल्याला कुठं पाहिलेलं आठवत नाहीं मला.'

' अहो, आठवणार कुठून ? राजाला सारे ओळखतात; पण राजा कुठं सगळ्यांना ओळखणार ? '

पंतांच्या ओंठांवर अभिमानाचें हंसूं आलें. पण तें आलें त्याच पावलीं परत पळालें. त्या ' किसलया'नें कूस मारलें, ' राजाचीच गोष्ट कशाला हवी नाना ? हुजऱ्याचं काम करणारा नट असला तरी देखील हाच अनुभव येतो. '

पंतांनीं भीत भीत त्या मुलीच्या चेहऱ्याकडे पाहिलें. तो कुठें तरी पाहिला आहे असें त्यांना वाटूं लागलें. कुठें बरें ?

कुसाचे आजोबा तोंड साफ करून ह्मणाले, ' पंत, माधव-बागेंतल्या तुमच्या प्रवचनांना अगदीं नेमानें येत होतों मी. पण ही माझी नात—मुलीची मुलगी—या शिक्षणानं बिघडवून टाकलंय् पहा सारं. देव नाहीं, धर्म नाहीं, नवरा नको कीं आजोबा नको ! इतका आग्रह केला तुमच्या धार्मिक प्रवचनांना यायला; पण -'

' कशाला जायचं ? स्त्री ह्मणजे मांजरी हें ब्रह्मज्ञान ऐकायलाच ना ? '

' पण पुरुषाचीहि कुत्र्याशीं तुलना करतोंच कीं मी ! ' आपली बाजू सावरण्याच्या उद्देशानें पंत ह्मणाले.

' ह्मणजे तुह्मी स्वतः कुत्रं आहांत तर—'

' कुसा—पोरी—कारटे—'

पंतांनीं न्यायाधीशाच्या स्वरांत उत्तर दिलें. ' हो, हो ! कुत्रा ह्मणवून घेण्यांत अभिमान वाटतो मला ! सनातनधर्माचं संरक्षण करणारा इमानी कुत्राच आहे मी ! "

' इमानी नाहीं—'

' कुत्रा इमानीच असतो ! '

'पण तो पिसाळतोहि पुष्कळदां—'

डब्यांत वीज पडल्याचा भास झाला पंतांना! म्हातारेबुवा किंचाळले, 'कुसा! कुसा!—'

ती मुलगी दगडी पुतळ्याप्रमाणें स्तब्ध बसली.

'कुसा क्षमा माग त्यांची. पड—पायां पड!'

पुतळ्याचे ओंठ कधीं हलतात का?

म्हातारे गृहस्थ थरथर कांपूं लागले; त्यांच्या डोळ्यांतून पाणी पाझरायला सुरवात झाली. आतां मात्र त्या मुलीला राहवेना. आपल्या आजोबांच्या खांद्यावर हळूच हात ठेवून ती म्हणाली, 'मागतें हं क्षमा मी!' लगेच पंतांकडे वळून किंचित् कुर्य्यानें ती उद्गारली, 'क्षमा करा मला.'

तिनें नानांना त्यांच्या अंथरुणावर निजविलें आणि पांघरूण घालून वत्सलतेनें ती त्यांच्या अंगावरून हात फिरवूं लागली. मघांची कालिका क्षणार्धांत लक्ष्मी झाली. पंतांना तिच्याकडे पुन:पुन्हा पाहण्याचा मोह कांहीं केल्या आवरेना. त्यांचें आर्य—मन मधून मधून त्यांना नीतिशतकांतल्या श्लोकाची आठवण करून देई. पण अनार्य मन शृंगारशतकाचें स्मरण करीत ह्मणे, 'बुड्ढेबुवा, बस्स करा आपलं तत्त्वज्ञान!' दोन बायकांच्या दादल्याला त्यांचा समेट घडवून आणण्याची कांहींतरी युक्ति हस्तगत करावी लागतेच. पंतांच्या तत्त्वज्ञानाच्या पोतडींतहि तशा कांहीं चिजा होत्या. त्यांनीं विचार केला—हिच्याकडे पाहणें हें पाप आहे खरें! पण न पाहून पाप थोडेंच नाहींसे होणार आहे! त्यापेक्षां समर्थ रामदास स्वामींनाच आपले गुरु करणं बरं नाहीं का? खिरीवर मन गेल्यावर ओकारी येईपर्यंत त्यांनीं खीर खाल्ली! बस्स, तस्सं अगदीं वीट येईपर्यंत पहात राहायचं या पोरीकडे!

नानांचा डोळा लागेपर्यंत कुसुम त्यांच्यापाशीं बसली. परंतु एवढ्या वेळांत पंतांना कांहीं तिच्याकडे पाहण्याचा वीट आला नाहीं. नाना स्वस्थ निजलेले पाहून ती पंतांच्या पुढे येऊन हलक्या स्वरांत ह्मणाली, 'दोनदां अर्धांगवायूचा झटका येऊन गेलाय् त्यांना, ह्मणून !—'

ही रणरागिणी मघांशीं आपल्याला शरण कां आली तें आतां पंतांना उमगलें !

'फार दुबळं झालंय् त्यांचं मन ! मी लग्न करायला कबूल नाहीं, हें इतकं लावून घेतलंय् त्यांनीं मनाला—'

'खरंच आहे. आतां आपला तुमचा पण असेल कांहींतरी तर—'

'पणच आहे माझा ! तीन भाऊ आणि तीन बहिणी अशीं सहा भावंडं आहेत माझ्या पाठीवर ! त्यांना पोसायचं जो कबूल करील—'

धनुष्यभंग अगर मत्स्यभेद यांपेक्षां हा पण बराच विकट आहे हें प्रामाणिकपणें कबूल करणें पंतांना प्राप्त होतें. पण पुष्कळ गोष्टी खऱ्या असल्या तरी त्यांची कबुली देणें कठिण वाटतें. नाहीं का ? पंतांनीं विषयच बदलला. ते म्हणाले, 'तुम्हांला कुठं तरी पाहिल्या-सारखं वाटतंय् !'

'कुठं तरी कां ? कॉलेजांतच कीं ! तुम्ही सीनियरमधें अस-तांना मी फर्स्ट इयरमधें होतें.' आपली कॉलेजभगिनी ! पंत आनंदले व घाबरलेहि !

कुसुम मिस्किलपणानें हास्य करीत म्हणाली, 'कॉलेजांत अस-तांना तुम्ही सुधारक मताचे होता कीं ! हें वेड कधीं लागलं तुम्हांला ?'

पंतांना वाटलें—उगीच नाहीं आपण स्त्रियांची निंदा करीत! काय म्हणे—धर्माभिमान म्हणजे वेड! ते तुच्छतेनें हंसले.

'सनातन धर्म म्हणजे काय हो चंडीरामपंत? अस्पृश्यता, रोगराई, अज्ञान, उपासमार हीं सारीं सनातन धर्माचीच लक्षणं आहेत वाटतं?'

'हे समाजाचे दोष आहेत. सनातनधर्म म्हणजे शुद्ध दया! केवळ प्रेम! पूर्ण सहानुभूति!'

'नुसती तोंडी कीं—मघाशीं तुमच्या डब्यांत एक बाई तान्हं मूल घेऊन उभी होती ताटकळत! डब्यांतल्या माणसांत औषधालासुद्धां सुधारक नसेल! पण त्या बाईला बसायला जागा करून दिली कां कुणी?'

पंत सर्दच झाले! कल्याण स्टेशनवर कुसुमनें त्यांच्या डब्याचें सहज निरीक्षण केलें होतें याचा त्यांना पत्ताच नव्हता. ते बाहेर पाहूं लागले. डोक्यावर इरलें घेऊन एक बाई जांभळाचे द्रोण विकीत होती. दुसरा एक लहान मुलगा द्रोण घेऊन इकडे तिकडे उघडा बोडकाच धांवत होता.

शत्रूनें पाठ फिरवतांच तोफखाना बंद करून भागत नाहीं, हें जाणण्याइतकी कुसुम चतुर होती.

'तुमच्या प्रवचनांना खूप गर्दी होते म्हणे!'

'त्यासाठींच बेळगांवला जातोंय् मी!'

'काय सांगणार आहां तुम्ही प्रवचनांत?'

'आमचा सनातनधर्म किती श्रेष्ठ आहे—'

'तो कसा?'

पावसाची जोराची सर आली. जांभळें विकणारा मुलगा धांवतच

त्या बाईकडे आला आणि चटकन् इरल्याखालीं शिरला. तें दृश्य पाहतांच पंत आनंदानें ओरडले, ' असा आहे आमचा सनातनधर्म ! '

कुसुमनें उत्सुकतेनें बाहेर पाहिलें. पण सनातनधर्माचा मूर्तिमंत अवतार तिला कुठेंच दिसेना ! पंत त्या इरलेवाल्या बाईकडे बोट करून प्रवचनाच्या स्वरांत ओरडले, ' या इरल्यासारखा आहे आमचा सनातनधर्म ! तें मूल कांहीं त्या बाईचं नव्हे ! पण इरलं डोक्यावर असल्यामुळं तिनं कांही त्याला भिजूं दिलं नाही. हाच तिच्या अंगावर रेनकोट असता तर—तर पोर पावसांत भिजून न्यूमोनिया होऊन मेलं असतं ना ! बस्स ! आमचा सनातनधर्म म्हणजे इरलं आणि तुमची सुधारणा म्हणजे रेनकोट ! '

कुसुमला हंसूं आवरेना. त्या हंशाचा अर्थ कळण्याइतका चंडीरामांच्या मनावर चढलेला या नूतन कल्पनेचा कैफ अजून उतरला नव्हता. नानांनीं हांक मारली, ' कुसा—'

चंडीरामपंत दिग्विजयी वीराप्रमाणें त्या नव्या रेनकोटांतून डुलत डुलतच आपल्या डब्याकडे गेले.

पंतांच्या डोळ्यांवरली दिग्विजयाची धुंदी बेळगांवच्या मुक्कामांत वाढतच गेली. सनातनधर्म व आर्यसंस्कृति यांविषयींचे त्यांचे नवे नवे सिद्धांत ऐकून श्रोते अगदीं बेहद्द खूष होत. अलीकडेच बोकाळलेल्या तरुणतरुणींच्या प्रेमावर टीका करतांना पहिल्या दिवशीं पंत म्हणाले, ' ब्रह्मचर्य—आजन्म ब्रह्मचर्य—हाच आमच्या आर्यसंस्कृतीचा आदर्श आहे. सध्यां आपण गणपती व मारुती या दोन्ही दैवतांची पूजा करतों. पण अष्टनायिकांशीं लाडीगोडी करीत बसणारा गणपती हें अनार्य दैवत आहे. अनार्य बापाचा अनार्य मुलगा आहे तो ! ' दुसरेच दिवशीं माकडापासून मनुष्यप्राणी झाल्याचा डार्विनचा सिद्धांतहि

आपल्या पूर्वजांना ठाऊक होता हें सिद्ध करण्याकरितां त्यांनीं मारुतीला वेठीला धरलें. त्यांच्या नावांत राम असल्यामुळेंच कीं काय बिचाऱ्या मारुतीनेंहि या संशोधनाबद्दल कांहीं तक्रार केली नाहीं.

दिग्विजयाला निघालेल्या राजपुत्राचा घोडा कुणीतरी मध्येंच आडवावा त्याप्रमाणें चंडीरामपंतांच्या चौखूर उधळलेल्या धर्माभिमानाच्या वारूलाहि मधून मधून कुणी अटकाव करी, नाहीं असें नाहीं. एकानें शंका काढली—शंकर हें जर अनार्य दैवत तर त्याचा अवतार असलेला मारुती आर्य कसा होईल ? दुसरा दीडशहाणा निघाला तो पंतांच्या कॉलेजांतल्या आठवणीच सांगूं लागला! हल्लीं भस्म फासणारे पंत त्या वेळीं चेहऱ्याला किती पावडर लावीत, आज रुद्राक्षांच्या माळांनीं अलंकृत झालेला त्यांचा कंठ त्या वेळीं किती निरनिराळ्या रंगांच्या गळोट्यांनीं भूषित होत असे, इत्यादि गोष्टी त्याच्या बोलण्यांतून बाहेर पडल्या. पण 'कॉस्मापॉलिटन'सारखे जाडे जाडे इंग्रजी शब्द, हेगेल-रसेलसारखीं पाश्चात्य नांवें, ज्यांचा अर्थ श्रोत्यांपैकीं एकालाहि कळणें शक्य नाहीं अशा वैदिक मंत्रांचें पाठांतर, असल्या चंडीरामबाणांपुढें त्या बिचाऱ्यांचा निभाव लागला नाहीं यांत नवल तें कसलें ?

'कुसा'चे आजोबा नित्यानियमानें पंतांच्या प्रवचनांना येत. एक परकरी मुलगी त्यांचा हात धरून त्यांना घेऊन येई. ओकारी येण्याइतकी खीर पिण्याचें तत्त्व पंतांनीं पूर्वीच अंमलांत आणलें असल्यामुळें कीं काय या मुलीकडे ते ढुंकूनहि पहात नसत ! मात्र एकदां प्रवचनानंतर आजोबा त्यांच्याशी गप्पागोष्टी करायला आले तेव्हां त्यांनीं हळूच कुसाताईची गोष्ट त्यांच्यापाशीं काढली. कोंकणांत तिचा चुलता आजारी आहे तिकडे ती गेल्याचें पंतांना कळलें. पंतांना आगगाडीं-

तल्या योगायोगाची आठवण झाली. त्यांना कोंकणांतून प्रवचनाचें निमंत्रण आलेंच होतें. आगगाडींत जशी तिची गांठ पडली तशी कोंकणांतहि पडणार नाहीं कशावरून, असा विचार त्यांच्या मनांत आला. त्याच क्षणीं म्हातारेबुवांनीं प्रश्न केला, 'तुमचं लग्न झालंय का पंत?' त्या रात्रीं परब्रह्माला खेळविणाऱ्या मायेचा विचार करण्याऐवजीं पंत कुसुमच्या चिंतनांतच दंग झाले. ते इतके कीं, दुसरे दिवशींच्या प्रवचनांत सनातनधर्म म्हणजे इरलें व सुधारणा म्हणजे रेनकोट हा आपला नवा सिद्धांत सांगायची आठवणदेखील त्यांना झाली नाहीं.

  

कोंकणांत दोनतीन शहरीं पंतांचीं प्रवचनें चांगलींच गाजलीं. मुसळधार पावसांत रेनकोट अंगावर घालून प्रवचनाला जाणाऱ्या व सुधारकांना शिव्या देतां देतां आपल्या भस्मचर्चित कपाळाला हात लावून 'काय हें देशाचं दुर्दैव' असे उद्गार काढणाऱ्या या बी. ए. सनातन्यांविषयीं सर्वत्र चर्चा सुरू झाली. चंडीरामपंतांची विद्वत्ता, वक्तृत्व, धर्माभिमान इत्यादिकांबरोबर त्यांच्या त्यागाची स्तुतीहि कर्णोपकर्णीं ऐकूं येऊं लागली.

बिचाऱ्या श्रोत्यांचा तरी काय दोष? पंत सनातनधर्माचे पुरस्कार करणारे प्रवचनकार कां झाले ही अंदरकी बात एक चंडीराम जाणे अशीच वस्तुस्थिति होती. नाहीं म्हणायला बी. ए. झाल्यानंतर त्यांनीं केलेल्या नोकरीच्या अर्जांना नकार देणाऱ्या लोकांचें एक चौकशीमंडळ नेमून त्यांच्यापुढें सनातनधर्माच्या स्तुतिस्तोत्रांवर उत्तम चरितार्थ चालविणाऱ्या सुशिक्षित लोकांच्या साक्षी घेतल्या असत्या तर पंतांच्या त्यागावर बराच प्रकाश पडला असता!

दोन तीन शहरें होतांच पंतांना सावंतवाडीजवळच्या एका गांवाचें आमंत्रण आलें. अर्धे शहर, अर्धे खेडें असेंच होतें तें! पण पंतांना त्याच्या लोकवस्तीशीं काय करायचें होतें? आपल्या पाकिटां-तील रकमेसह लोकांची धर्मश्रद्धा वाढवावयाची हें तर त्यांचें ध्येय होतें.

त्या गांवांतल्या देवळांत प्रवचनें सुरू झालीं. ती ऐकायला गर्दी किती व्हावी? एकाद्या संस्थानिकाची वरात पहायला जणुं कांहीं लोक लोटत होते. तीन दिवस छान गेले. चौथे दिवशीं तर पंतांची कळी पूर्णपणें उमलली. 'कुसा'च्या आजोबांचें सावंतवाडीच्या पत्त्यावर आलेलं पत्र त्यांना आज मिळालें होतें—'चि. कुसा तिकडे जवळच आहे. तुमचें गोत्र जमतें. पत्रिका जमतीलच. मुलगी आपण पाहिलीच आहे. ती लग्न करणार नाहीं म्हणते. पण ब्रह्मचर्याप्रमाणें लग्नावर एक प्रव-चन देऊन तोहि सनातनधर्म आहे हें आपणच तिच्या गळीं उतरवूं शकाल. तरी मी तिकडे केव्हां यावें तें कळवावें.' कांपऱ्या अक्षरां-तला हा मजकूर वाचून किती तरी वेळ पंतांचें हृदयहि मधुर कंपाचा अनुभव घेत होतें. त्यांनी आजोबांना सावंतवाडीला येण्याबद्दल उलट टपालानें पत्रहि पाठविलें.

आनंदाच्या या भरतीबरोबर त्यांची वक्तृत्वनौकाहि त्या दिवशीं डुलूं लागली. सनातनधर्माचें मोठेपण सिद्ध करण्याकरितां पंत भराभर पाठ केलेले दाखले देऊं लागले. इरलें व ओव्हरकोट त्यांच्यापुढें मूर्ति-मंत उभी राहिलीं. पंतांनीं गर्जना केली. "आमचा सनातनधर्म इरल्या-सारखा आहे. इरलें डोक्यावर घेणारा स्वतः तर भिजत नाहींच, पण प्रसंगीं दुसऱ्या मनुष्याचेंहि तो रक्षण करतो. सुधारकांना हवा अस-लेला धर्म म्हणजे नुसता रेनकोट आहे रेनकोट ! दिसायला ठाकठीक

पण दुसऱ्याला त्याचा काय उपयोग ?"

पंतांनीं आपल्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें इरलें व रेनकोट यांच्या तुलनेवर दहापंधरा मिनिटें बंबाळ भाषण केलें. इतक्यांत श्रोत्यांतून एक चिठ्ठी आली—

"सनातनधर्माची श्रेष्ठता सांगणारांनीं रेनकोट कां वापरावा ? त्यांनीं इरलंच वापरणं योग्य !"

कुसाच्या आजोबाच्या पत्रानं पंत सकाळपासूनच बेभान झाले होते. त्यांत इरलें वापरल्यापासून मिळणाऱ्या भयंकर प्रसिद्धीची भर पडणार ही कल्पना येतांच त्यांच्या अंगावर सात्विक रोमांच उभे राहिले. महात्मा गांधींनीं पंचा परिधान केल्याचा तो दिव्य दिवस ! त्यामुळें झालेला त्यांचा बोलबाला ! सनातन धर्माचे भावी इतिहासकार आपल्या या दिव्य कृत्याचें वर्णन सुवर्णाक्षरांनीं करतील. विजयोन्मादानें चंडीरामपंत बोलते झाले, "श्रोत्यांतून निनांवी चिठ्ठी आली आहे. नांव घालायला इतकं कां भ्यावं माणसानं ? आर्य लोक भ्याड नसतात ! कुणीतरी पुरुषानं स्त्रीसारखं अक्षर काढून ही चिठ्ठी पाठविलेली दिसते. आजकाल हिंदुस्थानांतल्या पुरुषांनीं कांकणं भरलेली दिसतात. हरहर ! ज्या आर्यभूमींत पूर्वी सोन्याचा धूर निघत असे, तिच्यांत बांगड्यांकरितां पेटविलेल्या कांचेच्या भट्टीचा धूर तेवढा दिसावा ?"

श्रोते चिठ्ठींत काय आहे हें जाणण्याला अगदीं अधीर झालेले पाहून पंतांनीं आपल्या उपव्याख्यानाचा समारोप केला—!

"सनातनधर्म इरल्यासारखा आहे तर तुम्ही इरलंच कां वापरत नाहीं असें या चिठ्ठींत विचारलें आहे. 'गर्दभादपि सुभाषितं ग्राह्यं' या बाण्याचे आम्ही आहोंत. ठीक आहे. आमची हीच प्रतिज्ञा—आम्ही

उद्यांपासून रेनकोट वापरणार नाहीं, इरलेंच वापरूं. सनातन धर्माचा विजय असो."

  

**या** प्रतिज्ञेनंतर झालेला टाळ्यांचा प्रचंड कडकडाट त्या रात्रीं झोंपेंतसुद्धां पंतांच्या कानांत इतका घुमत होता कीं, त्यांच्या मनाची कुरकुर त्यांना कितीतरी वेळ ऐकूंच येईना. पण पहिली झोंप पुरी होऊन ते कुशीवर वळले तेव्हां एकदम त्यांच्या मनांत आलें–आज इरलें डोक्यावर घेऊन मैल दीड मैल देवळापर्यंत जायचें! खंडाळयाच्या घाटांतील स्टेशनावर जांभळें विकणाऱ्या कातकरी बाईला इरलें शोभून दिसत असेल! पण आपण बी. ए.! उदयोन्मुख धर्मनिष्ठ प्रवचनकार! त्यांतून तरुण! डोक्यावर तें वेडेंवांकडें शिपतर घेऊन जायचें! सारे लोक हंसतील कीं! पण आतां माघार कशी घ्यायची? वरुणदेवतेला आपली दया आली तर चांगलें ऊन पडेल. पण आभाळ भरून आलें तर त्याच्याबरोबरच आपलीहि शंभर वर्षें भरायचीं! ताप आल्याचें सोंग एखादा दिवस करतां येईल. पण केव्हांतरी शेवटचें प्रवचन देऊन बिदागी गोळा केलीच पाहिजे. शिवाय कुसुमच्या आजोबांना सावंतवाडीला लवकरच येण्याविषयीं आपण पत्रहि पाठवलें आहे! शेवटीं चौदा वर्षें वनांत जाणारा राम, आजन्म ब्रह्मचारी राहणारा भीष्म, बोहल्यावरून सूबाल्या करणारा रामदास, आणि आग्र्याहून मिठाईच्या पेटाऱ्यांतून पळणारा शिवाजी या सर्वांचें स्मरण करून पंतांनीं आपला निश्चय केला. पण या निश्चयाचें फळ जी झोंप ती मात्र कांहीं केल्या येईना. सारी पहांट त्यांनी जागूनच काढली. मध्यें क्षणभर डोळा लागला तों स्वप्नांत एक इरलें दिसलें. हळुहळु तें मोठें होऊं

लागलें; आणि शेवटीं तर त्यानें आकाशाचेंच रूप धारण केलें. सनातन धर्माच्या व्यापकपणाचा हा दृष्टांत पाहून वास्तविक पंतांची झोंपमोड व्हायला नको होती; पण ती झाली खरी!

त्या दिवशीं प्रवचनापर्यंतचा वेळ पंतांनीं कसा घालविला तें त्यांचें त्याना ठाऊक! प्रवचनाचा तो शेवटचा दिवस त्यांना फांशीच्या दिवसासारखाच भासला. 'यज्ञाद्भवति पर्जन्यः' हें वचन आणि सध्यांचा यज्ञयागाचा अभाव आठवून त्यांना आज पाऊस पडणार नाहीं अशी आशा वाटूं लागली. पण रात्रीं पडलेल्या पावसाच्या पाण्यानें जागजागीं भरलेले खळगे पाहून ती लवकरच लयाला गेली. उत्साही गांवकऱ्यांपैकीं कुणीतरी सकाळींच त्यांच्या दारांत एक भलें मोठें इरलेंहि आणून ठेवलें होतें. नेहमींच्या वेळेच्या आधींच पंतांनीं बरोबरच्या दोनतीन लोकांना देवळाकडे पिटाळून लावलें. हो, मान दाखवावा जनांत हें तत्त्वहि सनातनच आहे, नाहीं का?

ऐनवेळेला वरुणदेवतेनें दगा दिलाच! नाइलाजानें पंतांनीं इरल्याच्या रूपानें सनातन धर्माला मस्तकीं धारण केलें. पहिली एक दोन मिनिटें बरेंच कठीण वाटलें त्यांना! पण ते एकटेच होते. एकट्या मनुष्याची हत्तीवर मिरवणूक काढली काय अगर गाढवावरून धिंड निघाली काय, त्याला कसला आला आहे त्याचा विधिनिषेध? त्यांतून पावसाच्या सरींवर सरी येत होत्या. अशा वेळीं रस्त्यानें जाणारीं माणसें स्वतःकडे लक्ष देतील का शेजारून जाणाऱ्या इरल्याच्या आंतला चेहरा बघतील?

पांच मिनिटांचा प्रवास झाला. पुढून कुणीतरी मनुष्य भिजत येत असलेलें पंतांना दिसलें. इरलें, सनातनधर्म, दुसऱ्या मनुष्याचें

रक्षण, आपल्या प्रवचनांतलें अक्षर न अक्षर पंतांना आठवलें. पण अरे बापरे! नुसतें मनुष्य नव्हतें तें! बाई! काय करणार बिचारे पंत! ती समोरून येत होती. तिला इष्ट स्थळीं पोंचविण्यासाठी प्रवचनाची वेळ तर चुकवायची नाहीं? इरलें किंचित् खालीं ओढून ते झपाटयानें चालूं लागले.

पण मनुष्याला ससा मानलें तर दैव हा शिकारी कुत्रा आहे. ती बाई बाजूनें जाईल अशी पंतांची कल्पना. पण तिच्या अंगांत कुठलें वारें संचारलें होतें कोणाला ठाऊक! ती पंतांशीं टक्कर मारायला आली. इरलें किलकिलें करून पंतांनीं तिच्याकडे पाहिलें मात्र-त्यांना तेतीस कोटि देवांची आठवण एकदम झाली! कुसुम! पावसानें ओली चिंब झालेली कुसुम त्यांच्याकडे पहात आणि हंसत उभी होती. पंतांनीं इरलें तिथेंच टाकलें आणि ते देवळाकडे धांवतच सुटले.

  

**त्या** आठवड्यांतील सनातनी वर्तमानपत्रांत पंतांच्या पलायनाची बातमी आली. पण ती अशी—

“पावसाने ओल्याचिंब झालेल्या दोन तीन बाया पाहून चंडीरामपंतांनीं आपलें इरलें त्यांना दिलें व ते भिजतच देवळाकडे गेले. सनातन धर्माचें मुख्य तत्त्व जें त्याग त्याचें ते किती कसोशीनें पालन करीत आहेत हें यावरून दिसून येईल. पंचा नेसणाऱ्या गांधींचे गोडवे गाणारीं सुधारक वर्तमानपत्रें इरलें घेणाऱ्या व तें प्रसंगीं दुसऱ्यांना देणाऱ्या पंतांच्या थोरपणाचें कौतुक करतील ही आशाच करायला नको!”

आणि झालेंहि तसेंच ! एका सुधारक वृत्तपत्रांत ही बातमी पुढील शब्दांत छापली गेली—"इरलेंधारी चंडीरामपंत वाटेंतच इरलें टाकून देवळापर्यंत पळन गेले. त्यांना वाटेंत बहुधा वाघ भेटला असावा ! वाघ नसला तरी वाघाची मावशी तरी असेल ! ( चंडीरामांचा सनातनकोश पहा—स्त्री = मांजरी )."

१९३४

# दोन गुलाम

त्या दिवसाची आठवण झाली म्हणजे माझ्या मनांत एक विलक्षण कल्पना चमकून जाते. सूर्याचा प्रकाश पृथ्वीवर एकाच वेळीं सर्वत्र पडणें कधींतरी शक्य आहे का ? सत्याचेंहि तसेंच आहे. अर्धी पृथ्वी नेहमीं अंधारांतच असायची हा जसा निसर्गाचा नियम, तशी सत्य भासणारी कुठलीहि गोष्ट अर्ध सत्य ठरायची असा मानवी जीवनाचा संकेतच असावा !

कॉलेजांतील मुलें फार वात्रट नि लेचट असतात, पांचटपणानें बोलतात, मुलींच्या नांवावर भलत्यासलत्या कोट्या करतात—एक ना दोन, किती तरी गोष्टी मी घरींदारीं ऐकत आलें होतें. [illegible]स्वीं खोट्या होत्या असें नाहीं. पण मुलें वात्रट असतात आणि मुली तशा नसतात असें थोडेंच आहे ! ज्या गांवच्या बोरी त्याच गांवच्या बाभळी. मुलें अस्मानाकडे पाहत कुचेष्टेंत दंग होतात आणि मुली जमिनीकडे बघत ती करतात, म्हणून काय दोघांत जमीनअस्मानाचें अंतर असतें असें म्हणायचें ? कांहीं गोष्टींचा पुरुषांना परवाना मिळालेला असतो म्हणून त्यांच्या वर्तनांत अतिरेक दिसतो एवढेंच. पण समाजाच्या पर-

जायच्यायायच्या वाटेवर पडतात आणि फुलें मात्र जागच्याजागींच। कोमेजून जातात !

  

**मा**झी थट्टा अगदीं अकारण होई असें मात्र मी म्हणत नाहीं. एकादे वेळीं स्वच्छतेविपयींच्या स्वत:च्या हव्यासाचा मला सुद्धां राग येई. मला पक्कें आठवतें, कुणातरी बड्या गृहस्थांच्या घरीं चहाला गेलों होतों आम्ही मी कुणाशीं तरी बोलत होतें. संभापण अगदीं रंगांत आलें होतें, इतक्यांत शेजारीं बसलेल्या मुलीचा धक्का लागून पेल्यांतला थोडा चहा माझ्या पातळावर पडला. झालें ! संभापणावरून माझें लक्ष उडालें आणि डागाकडे लागलें. चहाचा तो डाग धुण्याकरितां एकदम उठून जावें असेंसुद्धां मनांत आलें माझ्या. पण मंटळी हंसतील या भीतीनें मी जागेवरच चुळबुळ करीत राहिलें. माझा तो अस्वस्थपणा किती विचित्र होता ! आनंदांत असलेल्या मनुष्याच्या हातांत एकदम वाईट बातमीची तार पडावी तशी झाली होती माझी स्थिति.

चिक्कूपणामुळें मी अशी वागत होतें असें मुळींच नाहीं. त्याच दिवशीं तेंच पातळ एकाद्या गरीब बाईला मी देऊन टाकलें असतें. प[illegible]ावर पडलेला तो डाग मात्र एकाद्या शल[illegible]माणें माझ्या मनांत [illegible]ं लागला, यांत संशय नाहीं.

हीं एकच गोष्ट कशाला हवी ? पेपरांत प्रश्नांचें चुकीचें उत्तर लिहिल्याचें मला फारसें वाईट वाटत नसे. पण बोटें दुखूं लागल्यामुळें शेवटीं जें कुत्र्यामांजराच्या पायांसारखें अक्षर येई, तें मात्र मनांत डांचत राही. लहान मुलांची मला केवढी आवड ! पण एका हट्टी मुलानें मुद्दाम आपलें नाक माझ्या हाताला पुसलें, तेव्हां मला काळ-

च्च्या आंतच माझ्या हातानें त्याला एक चापट दिली. केर काढतांना मोलकरणीनें इकडली वस्तु तिकडे केली तरी माझ्या तळपायाची आग मस्तकाला जाई.

माझा हा स्वभाव अगदीं लहानपणींच दिसूं लागला असें आईच्या सांगण्यावरून दिसे. जेवतांना जर आमटीचा एखादा थेंब मांडीवर पडला, तर दोन वर्षांची पुष्पा रडून भोकांड पसरी. न्हाणीघरांत जाऊन तो थेंब धुतल्याखेरीज ती पुढचा घांस तोंडांत घ्यायला तयारच होत नसे. मी स्वतःच्या हातानें जेवूं लागल्यावर तर दर घांसामागें हात धुण्याचा हट्ट धरून बसे म्हणे! लहानपणीं शाळेंतून परत येतांना अंगावर खूप धूळ उडे. इतर मुलें घरीं आल्यावर खायची घाई करीत असतील. मी मात्र आईला आंघोळ घाल म्हणून अगदीं पुरेपुरे करून सोडी.

माझा हा स्वभाव बाबा आणि आई यांच्या सहवासांत वाढत गेला हें स्वाभाविकच होतें. बाबा जिथेंजिथें मामलेदार म्हणून जात तिथेंतिथें त्यांच्या कचेरीला जाण्यायेण्याच्या वेळांवरून लोक आपलीं घड्याळें लावीत असत. आईची गोष्टहि तशीच! संक्रांतीचें हळदी-कुंकू असलें तरी सुवासिनींना वाण म्हणून द्यायच्या वस्तु एका थाटाच्या, एका घाटाच्या असल्याच पाहिजेत असा तिचा विलक्षण कटाक्ष असे. अंगांत एकशें दोन ताप असला तरी आंघोळ केल्याशिवाय बरेंच वाटत नसे तिला!

  

**मी** जसजशी मोठी होऊं लागलें, तसतशी या स्वभावाची माझी मलाच भीति वाटूं लागली. माझ्या मनांत येई, मनुष्याला सुख मिळूं

नये अशी देवाचीच इच्छा आहे कीं काय कुणास ठाऊक! आई-बापांच्या मायेच्या सावलींत, बहिणभावांच्या प्रेमाचा गार वारा मिळत असल्यामुळें जगाच्या उन्हाची झळ मला लागण्याचा संभवच नव्हता. पण बाहेरील उन्हाची झळ लागली नाहीं, तरी आपल्या स्वभावांतले निखारे चटके दिल्याशिवाय थोडेच राहतात! मनुष्याला जगांत शत्रु नसले तरी तोच स्वतःचा शत्रु होतो.

मी बी. ए. झालें आणि माझ्या लग्नाच्या गोष्टी सुरू झाल्या, तेव्हां तर हे विचित्र विचार माझ्या मनांत अधिकच बळावले. यौवनाच्या उंबरठ्यावर उभें राहून भावी जीवनाचीं सुखस्वप्नें पाहण्यांत केवढा आनंद असतो! तो आनंद पृथ्वीवरील खड्याकांट्यांवर जाई-जुईच्या पायघड्या पसरतो, गंधर्वसृष्टींत नेणारें एक चिमुकलें विमान कुठून तरी आणतो आणि त्या विमानावर आकाशांतल्या चांदण्यांची अखंड पुष्पवृष्टि करीत राहतो. पण कुशल गायकाच्या गाण्यांत एकदम एखादा बेसूर यावा तसा त्या आनंदांतहि माझ्या मनांत एक विचार येई. आपल्या भावी पतीचा स्वभाव कसा असेल? पुष्कळ पुरुष म्हणे दुष्ट असतात, व्यसनी असतात. आपल्या वांट्याला काय येणार आहे? लग्न हा एक प्रकारचा जुगारच नाहीं का? हा जुगार खेळण्यापेक्षां लग्न न करतां कांहींतरी चांगलें काम जन्मभर करीत बसणें बरें नाहीं का?

पण मनुष्याचें रक्तच जुगारी आहे. बाबांनीं डॉ. प्रभाकरांना घरीं आणलें आणि मी त्यांना पाहिलें तेव्हां या जुगारी रक्ताचा कैफ माझ्या डोळ्यांवर चांगलाच चढला. प्रभाकर आमच्याकडे एकच दिवस होते. ज्याचा धंदा चांगला आहे अशा हुषार डॉक्टराला बायको पहायला अधिक फुरसत कुठून मिळणार? पण त्या एका दिवसांत माझी स्थिति किती विलक्षण झाली! प्रवासांत आपला बाळपणचा एखादा मित्र भेटावा

आणि मग त्याच्याशीं बोलतांबोलतां बरोबर प्रवास करणाऱ्या इतरांना विसरून जावें तसें झालें माझें ! प्रभाकरांच्या डोळ्यांतील निर्मळपणा, हास्यांतील माधुरी आणि त्यांची टापटीप यांनीं जणुं कांहीं मला मंत्र-मुग्ध केलें. त्या दिवशीं आईशीं सुद्धां मीं फारशी बोललें नाहीं. प्रभाकर निघून गेल्यावर मायेनें माझ्या तोंडावरून हात फिरवत ती म्हणाली, ' आजच इतकी विसरलीस मला ! मग उद्यां लग्न झाल्यावर—'

लग्न झाल्यानंतरची चित्रेंच त्या रात्रीं मी एकसारखी पाहत होतें. जणुं कांहीं वाऱ्यावरून मी नाचत होतें आणि फुलांचा मंद गंध माझ्याभोंवतीं दरवळत होता. प्रभाकर मोठे डॉक्टर होते, चांगले देखणे होते, या गोष्टींपेक्षां दुसऱ्याच एका गोष्टीचा अधिक आनंद झाला होता मला. ती म्हणजे प्रभाकर अगदी गरिबींतून एवढ्या मोठ्या पदाला चढले होते. असलींच माणसें निर्व्यसनी असतात. व्यस-नाचे चोचले पुरवायला पैसा आणि वेळ मिळतच नाहीं गरिबांना ! प्रभाकर किती निर्व्यसनी होते हें चार घटकांतच नाहीं का दिसून आलें ? बाबांनीं सिगारेटची पेटी पुढें केल्यावर हंसून नमस्कार करीत ते उत्तरले, ' थँक्स् ' ! त्यांनीं त्या पेटीला स्पर्शसुद्धां केला नाहीं.

हें पाहून माझ्या हृदयावरची केवढी मोठी धोंड उतरली. लग्ना-विषयींच्या भीतीची जागा हां हां म्हणतां उत्सुकतेनें घेतली.

  

प्रभाकरांच्या संसाराची स्वामिनी होऊन मी मुंबईला राहायला आलें. त्या दिवसाचा क्षण नि क्षण अजून माझ्या डोळ्यांपुढें उभा राहातो. सकाळीं आठाला ते दवाखान्यांत गेले आणि दुपारीं एक वाजतां परत आले. पण तोंपर्यंत त्यांच्या खोलीचें स्वरूप मी इतकें

बदलून टाकलें होतें, कीं ते खोलीच्या दारांत आश्चर्यानें थबकून उभेच राहिले.

'या ना आंत !' टेबलावरला त्यांचा फोटो सकाळीं पुसला होता तरी तो पुन्हा पुसत मीं म्हटलें !

'मला वाटलं, दुसऱ्याच्याच घरांत चुकून शिरलोंय् मी ! पार बदलून गेली कीं ही खोली !'

'खोली बदलली तरी माणसं बदलत नाहींत ना ?'

ते आंत आले आणि माझा आनंदानें कंप पावणारा हात हातांत घेऊन म्हणाले, 'पुष्पा, जग बदललं तरी आपली माणसं कधीं कधीं बदलूं नयेत ! नाहीं ?'

आनंदानें मनुष्याच्या विनोदाला बहर येत असावा ! ते लगेच पुढें म्हणाले, 'आणि माणसांत बदल व्हायचाच असला तर तो या खोलीसारखा तरी व्हावा. म्हणजे माणसानं बदलून अधिक सुंदर व्हावं !'

'मलाच सूचना आहे वाटतं ही ?' असें विचारायचें अगदीं जिभेवर आलें होतें माझ्या ! पण ओंठांच्या अलीकडे असलेले शब्द त्यांच्यापलीकडे घालवणें बायकांना किती कठीण जातें हें त्या वेळीं मला कळून चुकलें. स्वारी आतां कपडे काढील म्हणून मी थोडा वेळ गप्प बसलें. पण तो कांहीं रंग दिसेना. तेव्हां मीच म्हटलें, 'जेवायचंय् म्हटलं अजून !'

'अरे हो ! विसरलोंच होतों कीं मी !'

'एकादी केस डोक्यांत घोळत असेल !'

'केस कशाला हवी ? इतक्या सुंदर रीतीनं सजवलेली ही खोली पाहून माझी तर तहानभूकच हरपली. पुष्पा, माझ्या आयुष्यांतलं एक

मोठं भय आज नाहींसं झालं !'

'मोठ्या मोठ्या शस्त्रक्रिया करणारे डॉक्टरसुद्धां बायकांसारखे भित्रेच असतात का?'

'ते बायकांहूनहि अधिक भित्रे असतात!'

मी नुसती हंसलें.

ते पुढें म्हणाले, 'जखमेंत धुळीचा एक कण गेला तर केवढा अनर्थ होतो याची पूर्ण कल्पना असते असल्या डॉक्टरांना ! कितीतरी दिवस लग्नच करूं नये असें वाटत होतं मला. मनांत येई, आपल्या-इतकी स्वच्छतेची आणि टापटिपीची आवड आपल्या बायकोला असली तर बरं! नाहींतर—' डोळे भरून खोलीच्या सजावटीकडे पाहत ते म्हणाले, 'पण जगांत देव आहे आणि तो उदारहि आहे. आंधळा मागतो एक डोळा तर देव देतो दोन!'

बोलण्यांत त्यांच्यावर मात करण्याची संधि मी शोधतच होतें. सुचलें तें मी लगेच बोलून गेलें.

'पण दोन डोळे बरे नाहींत!'

'कां?'

'एका डोळ्याला जें दिसत नाहीं, तें दुसऱ्याला दिसतं!'

'एवढंच ना? ज्याला कांही लपवायचं असेल, त्याला या दुसऱ्या डोळ्याचं भय वाटेल! मला नाहीं.'

त्यांच्या या आत्मविश्वासाच्या उद्‌गारांनीं माझें मन कसें फुलून गेलें. माझ्यापासून लपवून ठेवण्यासारखी एकहि गोष्ट त्यांच्या आयुष्यांत घडलेली नाहीं! किती तरुणींच्या वांट्याला हें भाग्य येत असेल?

जेवून ते परत दवाखान्यांत जायला निघाले. जातांजातां ते म्हणाले, 'परत यायला उशीर होईल हं मला!'

माझ्या मनाची छाया मुद्रेवर पडली असावी! ते चटकन् उद्गारले, 'अशी काय करतेस लहान मुलीसारखी? होतां होईल तों लवकर येईन मी!'

मी लहान मुलीसारखें कांहींतरी करीत होतें? छे: !

तिनीसांजा झाल्याबरोबर माझें हृदय गोड हुरहुरीनें भरून गेलें. आतां प्रभाकर येतील, मग आपण दोघें एकमेकांशीं खूप खूप बोलत बसूं. हो, पण बोलायला विषय तरी काय आहेत आपल्यापाशीं?— छे: ! एकमेकांवर प्रेम करणाऱ्या माणसांचा वेळ संपतो; पण विषय कांहीं संपत नाहींत. राम आणि सीता अरण्यांत उजाडेपर्यंत बोलत बसत नसत का? ती दोघें वेदांताची चर्चा करीत असत असें थोडेंच आहे!

रात्र मोठी विलक्षण जादुगारीण आहे. ती आकाशांतल्या नक्षत्रां-बरोबर मनांतल्या कोमल भावनाहि फुलवते. प्रभाकर आतां येतील, मग येतील, म्हणून क्षणाक्षणाला मी उत्कंठित होत होतें. कुठें मोटारीचा आवाज झाला कीं खिडकींतून बाहेर बघण्याचा मोहहि आवरत नसे मला. पण प्रत्येक वेळीं माझी निराशाच होई. स्वयंपाकीणबाईंना सारें आव-रून ठेवायला सांगून मी अंथरुणावर विचार करीत पडलें. मनुष्याच्या दुबळ्या मनाला साध्या गोष्टींतहि अशुभाचा भास होतो. माझेंहि तसेंच झालें. प्रभाकरांना आपलें आजचें काम उद्यांवर टाकतां आलें नसतें का? नाहींतर दुसऱ्या डॉक्टराकडे द्यायचें होतें तें! ज्या दिव्य क्षणाची—ज्या मधुमीलनाची—स्त्रीचें हृदय उत्कंठेनें वाट पाहतें, त्याच्यांतलें काव्य पुरुषांना खरोखरीच कळत नसावें. प्रेम हासुद्धां व्यवहारच वाटतो त्यांना! पुरुषजातीच्या क्रूरपणाच्या ऐकलेल्या आणि वाच-लेल्या अनेक गोष्टी माझ्या डोक्यांत थैमान घालूं लागल्या. मन

असें शिणून गेल्यावर मग माझा केव्हां डोळा लागला कुणास ठाऊक !

त्या झोंपेंतून मी दचकून जागी झालें ती एका विचित्र शिसारी आणणाऱ्या वासानें. क्षणभर मी कुठें आहे हेंच कळेना ! मग मन सावध झालें. प्रभाकरांनीं माझें चुंबन घेतलें होतें आणि पुन्हां हंसतहंसत माझ्याकडे पाहत त्यांनीं चुंबन घेतलें. त्या दुर्गंधीनें माझें डोकें अगदीं फिरून गेल्यासारखें झालें. मळमळल्यासारखें वाटून मी उठून बसलें. धड ओकून पडेना आणि धड त्या वासाची ओकारी नाहींशींहि होईना ! स्त्रीच्या आयुष्यांतल्या अत्यंत आनंदाच्या या मंगल प्रसंगीं माझी संतप्त झालेली मुद्रा पाहून प्रभाकरहि चरकले. माझ्याजवळ येऊन ते म्हणाले, 'पुष्पा, मला क्षमा कर ! एका बाळंतिणीची सुटका करावी लागली आज. एका मनुष्याचे प्राण वांचवण्याकरितां आपल्या सुखांत थोडा उणेपणा आला म्हणून तूं कांहीं रागावणार नाहींस.'

'पण तुम्ही रागावलां असाल !' मीं कुऱ्यानें म्हटलें.

'मी ?'

'आपल्या सुखांत एवढासुद्धां उणेपणा खपत नाहीं पुरुषांना !'

मी काय बोलत आहे याचा अर्थहि त्यांना कळला नसावा ! मी संतापानें उद्गारलें, 'सिगारेट ओढणं हा पुरुषांचा खेळ होत असेल ! पण बायकांचा जीव जातो त्यानं !'

माझ्याकडे निरखून पाहून ते शांतपणानें आपल्या पलंगावर जाऊन झोंपले. त्यांनीं माझ्यापाशीं यावें, 'तुझ्याकरितां मी सिगारेट सोडून देईन' असें विनवून म्हणावें, अशी इच्छा माझें मन करीत होतें. ती तृप्त न झाल्यामुळें माझा अहंकार दुखावला आणि तडफडत,

चडफडत घड्याळाचे दोन, तीन, चार हे ठोके मी ऐकले. मधूनमधून त्यांचें घोरणें मला ऐकूं येई आणि माझ्या जिवाचा अधिक संताप होई. 'पुरुषांना प्रेम कळत नाहीं, फक्त उपभोग तेवढा कळतो' हें मला खरें वाटूं लागलें. आतां त्या रात्रीच्या माझ्या विचारांचें मला हंसूं येतें. पण त्या वेळीं माझें मन म्हणत होतें, 'हे सिगारेट ओढतात; दारूहि पीत असतील ! नाहीं कशावरून ? पुष्पा, तुला एवढीशी घाण सहन होत नाहीं. आतां कसं होणार तुझं ?'

दुसरे दिवशीं सकाळीं ते आपणहून मला म्हणाले, 'पुष्पा, सिगरेट सोडण्याचा प्रयत्न करून पाहतों मी !' या शब्दांची चीड आली मला ! काय पण पुरुषांची भाषा ! सोडण्याचा प्रयत्न करून पाहतों म्हणे ! म्हणजे मनांतून सोडायचीच नाहीं ! बायकांना त्रास होतो याची कशाला ते काळजी करतील ? शिकाऱ्याच्या मनाला हरिणी-विषयीं कधीं द्रव येतो का ?

दररोज रात्रीं ते घरीं परत आले कीं 'आज सिगरेट ओढली होती का ?' हा प्रश्न त्यांना मी विचारी. त्यांनीं 'नाहीं' म्हटलें तरी 'माझ्या गळ्याची शपथ ?' असें विचारायलाहि मी कमी करीत नसे. माझ्या या प्रश्नामुळें त्यांना वेदना होत असाव्यात. किती उदासीन दिसे त्यांचा चेहरा !

पण व्यसनें कांहीं सुखासुखी सुटत नसतात ! मी मुद्दामच त्यांच्या या वेदनांकडे दुर्लक्ष करी.

जवळ जवळ तीन आठवडे असे गेले. आमच्या लग्नाला उद्यां महिना होणार. एका महिन्यांत आपल्या पतीला एका व्यसनापासून आपण मुक्त केलें म्हणून हा मंगल दिवस सुंदर रीतीनें साजरा कर-ण्याची हौस आली मला. उद्यां प्रभाकरांना कोणती भेट द्यावी याचा

विचार करकरून मी थकलें. शेवटीं ते रात्रीं परत आले, कीं त्यांनाच आपलें हें कोडें सोडवायला सांगायचें असा मी मनाशीं निश्चय केला.

पण त्या दिवशीं रात्रीं बारा वाजेपर्यंत ते घरीं परत आलेच नाहींत आणि आले ते बेदरकारपणें सिगरेट ओढीत! माझ्या डोळ्यां-वर विश्वासच बसेना माझा. संतापानें बेभान होऊन मीं विचारलें, 'हें काय?'

'सिगरेट.' त्यांनीं शांतपणें उत्तर दिलें.

'ती ओढायची नाहीं असं कबूल केलं होतं तुम्ही माझ्या-पाशीं!'

'संध्याकाळपासून पन्नास ओढल्या मीं?'

'पन्नास?'

'मधल्या उपासाची भरपाई करतोय्!'

'शरीराची असली गुलामगिरी मला नाहीं आवडत!'

'आवडीनं कुणीहि कशाचा गुलाम होत नाहीं.'

'फेंकून द्या ती सिगारेट!'

'देणार नाहीं.'

'पहा हं!'

'लग्न व्हायच्या आधींच पाहिली आहे तुला!'

'पण मीं कुठं तुमचं खरं स्वरूप पाहिलं होतं? नाहीं ना तुम्ही ती सिगारेट फेंकून देत?'

'नाहीं.'

'मग माझीहि या घरांत राहाण्याची इच्छा नाहीं!'

  

दुसरे दिवशीं सकाळीं ते दवाखान्यांत जायला निघाले तेव्हां मी म्हटलें.

'पुण्याला जातेंय् मी!'

'ठीक आहे. यावंसं वाटलं म्हणजे ये!'

त्यांच्या या उद्‌गारांनीं माझें मन अधिकच भडकून गेलें. आपण वाटेल तसा धांगडधिंगा घातला तरी बायकांनीं आपल्याभोंवतींच पिंगा घातला पाहिजे असें या शिकल्यासवरल्या पुरुषांना सुद्धां वाटावें ना? मी वैतागाने खोलींत जाऊन माझ्या सामानाची बांधाबांध करूं लागलें. माझ्या कुंकवाच्या पेटीवरच एक पत्र पडलें होतें. अक्षर तर त्यांचें दिसत होतें. मी झट्‌कन् तें उघडून वाचूं लागलें.

'प्रिय पुष्पा,

'तुझ्यापासून एक दिवसही दूर राहाण्याची माझी इच्छा नाहीं. एकमेकांपासून दूर होण्याकरितां का आपण जवळ आलों आहों? एकमेकांच्या दोषांकडे बोटें दाखविण्याकरितां कां आपण आपले हात एके ठिकाणीं गुंफले आहेत? बोहल्यावर अर्धी घटका दोघांमध्यें आलेला अंतरपाटसुद्धां आपल्याला असह्य झाला होता आणि आतां तूंच आपणहून दोघांमध्यें एक उंचच्या उंच भिंत निर्माण करीत आहेस.

तुझ्यासारख्या अत्यंत निर्मळ वातावरणांत वाढलेल्या मुलीला सिगरेटचा वास असह्य होत असेल हें मीहि मान्य करतों. म्हणून तर पहिल्या दिवशीं मीं सिगरेट सोडायचें तुझ्यापाशीं कबूल केलें. त्याप्रमाणें तीन आठवडे मी वागलोंहि. पण या तीन आठवड्यांत बंडखोर शरिरानें मला किती त्रास दिला! साऱ्या कार्यांतहि मी कसा घोंटाळूं लागलों याची तुला कल्पना आहे का? बारा वर्षांची संवय बारा

दिवसांत नाहींशी होत नाहीं. संवय शब्द सौम्य वाटून तूं म्हणशील, 'बारा वर्षांची गुलामगिरी !' होय ! या बाबतींत शरिराचा मी गुलाम झालों आहें हे मला काय कळत नाहीं ? पण कळूनच काय, जळूनसुद्धां कांहीं गोष्टी जगांत वळत नाहींत. दिवसा धूम्रपान करायचें नाहीं हा नियम मीं स्वतःला कष्टानें लावून घेतला आहे. पण दिवसभर कामाच्या रगाड्यांत पिळून निघाल्यानंतर संध्याकाळीं सिगरेट ओढली नाहीं, तर पुढें कामच होत नाहीं माझ्यानें ! काल संध्याकाळीं एक विचित्र केस आली. सारी बुद्धि पणाला लागण्याचा प्रसंग होता तो ! ती बाई आतां मरते कीं घटकेंत मरते अशी स्थिति होती. मृत्यूच्या जबड्यांतून तिला परत आणून मी परत घरीं आलों. पण मनावरला तो ताण सहन करण्याकरितां तेवढ्या वेळांत सिगरेटचीं तीन चार पाकिटें मीं फस्त केलीं होतीं.

'तूं म्हणशील—ही शरिराची गुलामगिरी आहे. मीहि तें कबूल करतों. पण ज्या शरिराला आपण गुलामासारखें राबवून घेतों, तें सूड म्हणून आपल्याला गुलाम करूं लागलें तर त्याचा इतका राग कां यावा आपल्याला ? तूं सुखांत, एकांतांत, शांत नि पवित्र वातावरणांत वाढलीस. त्यामुळें शरिराची गुलामगिरी मनुष्य कां पत्करतो याची कल्पनाच तुला येऊं शकत नाहीं. पण माझ्या शरिराच्या गुलामगिरी-पेक्षां तुझी मनाची गुलामगिरी काय अधिक चांगली आहे ? लहान-पणापासून सिगरेट ओढणें वाईट असें तुझ्या मनावर ठसवलें गेलें, तूं तेंच घोकीत आलीस, तुझ्या नाकाला सिगरेटचा वासहि सहन होई-नासा झाला. हीं सारीं मनाच्या गुलामगिरीचींच लक्षणें नव्हेत का ? जगांत माणसें कशीं जगतात, दारिद्र्य आणि दुःख यांच्या खाईंतून जात असतांना त्या चटक्यांचा विसर पडावा म्हणूनच तीं कशीं व्यसनी

होतात, याची तुझ्यासारख्या सुखवस्तूंना कुठून कल्पना असणार ? आराम खुर्चीत बसून जीवनाच्या पावित्र्याचे नियम निश्चित करणारे लोक अत्यंत निष्ठुर असतात. सामान्य माणसाचें जीवन सुंदर बंगल्यांत हंसतखिदळत राहत नसतें. तें ओल आलेल्या झोंपडींत, उष्णतेनें होरपळून निघणाऱ्या गिरणींत, आणि गुडघाभर चिखलानें भरलेल्या शेतांत जगण्याची धडपड करीत असतें. श्रीमंतांना याच काय, पण पुढच्या जन्माचीही काळजी वाटत नसेल ! गरिबांना मात्र सकाळ झाली कीं दुपारची भीति वाटूं लागते. दारांत उभ्या राहिलेल्या मृत्यूवरून ओंवाळून टाकायला सोन्याचे तुकडेहि त्यांच्या घरांत नसतात. गरिबांना अहोरात्र लढावें लागतें या जगांत. जखमांतून रक्त वाहत असतांना लढत राहणाराला पराच्या गादीवर लोळणाऱ्यांची स्वच्छता साधत नाहीं. पण हा दोप कुणाचा ?

'पुष्पा, कोणतेंहि व्यसन ही शरिराची गुलामगिरीच असते. मानवी जीवन सुंदर, संपूर्ण, सुखी व्हायचें असेल तर त्यांत गुलामगिरीचा एवढासुद्धां अंश असूं नये हें मलाहि पटतें. पण माणसें शरिराची गुलामगिरी कां पत्करतात, हें मनाची गुलामगिरी करणारांना कधींच कळायचें नाहीं. माझ्या रोग्यांत अनेक माणसें दारूबाज असतात, उपदंशासारखे भयंकर विकार झालेले लोकहि त्यांत असतात. मला त्या रोगांचा मनस्वी तिटकारा येतो; पण त्या माणसांचा येत नाहीं. असल्या प्रत्येक रोग्याच्या पोटांत शिरून मी त्यांचें पूर्वचरित्र ऐकून घेतों आणि मग शंभरांतल्या साठसत्तरांविषयीं तरी माझ्या मनांत सहानुभूति उत्पन्न होते. पुष्पा, मनुष्य प्राणी दुबळा आहे; तो कांहीं निर्ढावलेला गुन्हेगार नाही. त्याच्या दुबळेपणाला समाजाच्या

निर्दयपणाची जोड मिळत नसती, तर जग आजच्यापेक्षां अनंतपटींनीं सुखी झालें असतें.

'माझीच गोष्ट सांगतों तुला. माझे वडील मी पांच वर्षांचा असतांना वारले. एका संस्थानांत नोकर होते ते. दुपारीवद्दल त्यांची फार ख्याति होती. पण त्यांच्यामागें एक विधवा व दोन पोरकीं पोरें जिवंत आहेत याची दखल कुणींहि केली नाही. लांच घेण्याइतकें माझ्या वडिलांचें मन हलकट असतें, तर त्यांच्या मृत्यूनंतर भाड्याच्या दोन खणांच्या खोलींत राहण्याची वेळ आमच्यावर आलीच नसती. आम्ही बंगल्यांत राहिलों असतों ! पण ते प्रामाणिक होते.

'आणि म्हणूनच त्यांच्या बायकांमुलांना मोलमजुरी करून आपलें पोट भरण्याची पाळी आली.

पुष्पा, माझ्या आईनें काबाडकष्ट करून मला शिकविलें. आक्का थोडीशी मोठी झाल्यावर तीहि आईला मदत करायला लागली. मॅट्रि-कमधें माझा पहिला नंबर आला. ईर्ष्येनें मी वैद्यकीकडे वळलों. त्या-वेळीं एकएक रुपया म्हणजे परब्रह्म होतं मला.

पण आईनें माझ्यासाठीं आपला बळी दिला असें शेवटीं मला आढळून आलें. अर्धपोटीं राहून वर्षानुवर्षें ती राबत होती. मनुष्य जिथें भावनांची कदर ठेवीत नाहीं, तिथं निसर्गाला बोल लावण्यांत काय अर्थ आहे ? आईला क्षय झाला. तिची शुश्रूषा करतां करतां आक्कानेंहि त्याच रोगानें अंथरुण धरलें. त्या वेळीं मी आत्महत्या कशी केली नाहीं—निदान इतरांचे खून कसे केले नाहींत याचें माझें मलाच आश्चर्य वाटतें. क्षयाच्या रोग्याजवळ मित्रें आसइष्ट फिरकायलाहि तयार होईनात. क्षयरोग्याकरितां बांधलेलीं इस्पितळें पुष्कळ आहेत. पण त्याच्या आंत जायला पैशाचा परवाना लागतो.

एका कोंदट खोलींत या दोन रोग्यांची रात्रंदिवस सेवा केली मी ! यशाची आशा नव्हती मला ! पण—पण माझी आई, माझी आक्का— त्या दोघींतच त्या वेळचें माझें त्रिभुवन सांठवलेलें होतें. अभ्यासाचा भार, पैशाची काळजी, दोन क्षयरोग्यांची शुश्रूषा, जेवायला नाहींच, पण झोंपायला सुद्धां सवड मिळत नसे मला. रात्रीच्या रात्री मी आईच्या आणि आक्काच्या बिछान्यापाशीं जागत आणि वाचीत राही. शरीर जागूं देत नसे ! तें डोळ्यांवर झांपड आणी. झोंप ही शरीराची गुलामगिरी वाटूं लागली मला. तिचे पाश तोडण्याकरितां मी धूम्रपान सुरू केलें. एका रात्रीं मी किती विडया ओढीत असे याची कल्पनासुद्धां तुला करतां येणार नाही. दीड वर्ष असें मी काढलें. आई गेली, आक्का गेली, आणि मीहि धूम्रपानाच्या आहारीं गेलों.

मी शरीराचा गुलाम आहे, अपूर्ण आहें, हें मला कळतें. पण तूं मला सोडून गेलीस म्हणजे कां मी पूर्ण होणार आहे ? तुझ्या मनाच्या गुलामगिरीनें का माझी शरीराची गुलामगिरी नाहींशी होणार आहे ? खूप खूप लिहावेसें वाटतें. पण प्रीतीला एका अश्रुबिंदूचा सुद्धां अर्थ कळतो, खरें ना ?

तुझा
प्रभाकर'

तीनतीनदां मी तें पत्र वाचलें आणि तडक बाजारांत गेलें.

  

दुपारीं एक वाजतां प्रभाकरांनीं आपल्या खोलींत पाऊल टाकलें तेव्हां त्यांचा चेहरा किती उदासवाणा दिसत होता ! त्यांनीं खोलींत इकडे तिकडे पाहून एक सुस्कारा सोडला. लगेच त्यांची दृष्टि टेबलाकडे वळली. ते एकदम उद्गारले,

'ही सिगारेटची पेटी कुणाची?'

मच्छरदाणीच्या आंतून मी उत्तरलें, 'तुमची! एका गुलामाची दुसऱ्या गुलामाला भेट आहे ही!'

ते हंसत पलंगाकडे आले व मच्छरदाणी दूर करून मला अभिवंदन करीत म्हणाले,

'स्वातंत्र्यदेवतेचा जयजयकार असो!'

१९३८

# शेजारी

किती सुंदर तळें होतें तें ! जणुकांहीं आकाशांतील मेघमालिकांनीं जातां येतां आपला शृंगार पाहण्याकरितां सुंदर आरसाच पृथ्वीवर ठेवविला होता.

त्या तळ्याच्या कांठावर सुंदर झाडीही होती. गोल बिलोरी आरशाची नक्षीदार चौकटच !

तळ्यांत मासे आनंदानें नाचत. झाडींत पक्षी उल्हासानें गात.

योगायोगानें एका माशाची आणि एका पांखराची ओळख झाली.

पांखरानें विचारलें ' तळ्याच्या आंत पोहतांना मोठी मौज वाटत असेल नाहीं ? '

अहंकार कुणाला नसतो ? माशानें तळ्याच्या आंतील चमत्कारांचें वर्णन केलें. तें वर्णन संपल्यावर माशानें विचारलें ' आभाळांत उडतांना मोठी गंमत वाटत असेल नाहीं ? '

पांखरानें एखाद्या महाकवीला शोभेल असें वर्णन केलें. मासा मनांतल्या मनांत तळमळूं लागला.

लवकरच दोघांची तळ्याच्या कांठावर गांठ पडली. मासा पाण्या-बाहेर पडत होता. पक्षी पाण्यांत उतरत होता.

झाडावर चढून मग आभाळांत उडण्याची माशाची महत्वा-कांक्षा होती.

पाण्यांत बुडून तळ गांठायची पांखराची महत्वाकांक्षा होती.

पण मासा झाडापर्यंत सुद्धां पोंचला नाहीं. तळ्याच्या कांठावरच तो तडफडत मेला.

आणि पांखरूंही तळ्याच्या तळापर्यंत गेलें नाहीं. पाण्यांतल्या वेलीच्या जाळ्यांत पाय अडकून तें मधल्यामधेंच गुदमरून मेलें !

त्या दिवशीं तळ्याच्या कांठावरलीं पांखरें आपापसांत ह्मणत होतीं ' या झाडीजवळ तळं आहे हें फार चांगलं आहे हं ! असेच मधून मधून मासे मिळत जातील आपल्याला खायला ! '

आणि तळ्यांतले मासे म्हणत होते ' आपल्या तळ्याजवळ झाडी आहे हें फार चांगलं आहे हं ! अशींच मधून मधून पांखरें मिळत जातील आपल्याला खायला ! '

१९३८

# स्वप्नें

त्यांचे हात एकमेकांच्या गळ्यांत होते. त्यांचा श्वास एकरूप होत होता. पण त्यांचीं मनें ?

तो स्वप्नांत पाहत होता—' आपली एक बाग आहे. तिच्यांत जिकडे तिकडे कळ्याच कळ्या दिसत आहेत. फूल मात्र एकही नाहीं. या साऱ्या कळ्या उमलल्यावर त्या सुगंधानें मोहित होऊन सारें जग आपल्या बागेकडे धांव घेईल याविषयीं त्याला शंका नव्हती.

कुणीतरी एक रमणी त्या बागेंत शिरली. ' कुणाच्या परवानगीनें तुम्हीं आंत आलांत ? ' असा प्रश्न आपल्या अगदीं ओंठावर आला. पण असला उद्धट प्रश्न सुंदर स्त्रीला कुणीतरी पुरुष विचारूं शकतो कां ?

ती रमणी बागेंत फिरूं लागली. आपली केशभूषा करण्याकरितां तिनें कितीतरी कळ्या खुडल्या. आपल्याला वाटलें—खुडून खुडून किती कळ्या खुडील ही ? तिच्या सुंदर मुखाकडे मुग्धपणानें पाहत आपण स्वस्थ बसलों.

हां हां म्हणतां तिच्याभोंवतीं बालकें जमली. त्या स्त्रीनें तीं कुठून आणलीं कुणाला ठाऊक ! पण त्या साऱ्या पोरांनीं बागेंतल्या कळीन् कळीचा चोळामोळा करून टाकला.

त्या स्त्रीचा विलक्षण राग आला आपल्याला. वाटलें कुठून तरी विष आणावं आणि तें तिला पाजून—'

याच क्षणीं तिच्याही स्वप्नांत ती एका पुरुषावर अशीच चिडून गेली होती. कुठून तरी विष आणून तें त्याला पाजावें हाच विचार तिच्या मनांत आला होता. त्याला कारणही तसेंच होतें.

आपल्या मंदिरांत जगाला वेड लावील अशी रतीची मूर्ति घडविण्यांत ती गढून गेली होती. इतक्यांत कोणीतरी पुरुष तिच्याजवळ आला. किती मोहक होता तो ! 'कुणाच्या परवानगीनें तुम्ही आंत आलांत ?' असा प्रश्न अगदीं तिच्या ओंठावर आला. पण असला उद्धट प्रश्न मोहक पुरुषाला कुणीतरी तरुण स्त्री विचारूं शकते कां ?

तो पुरुष खालीं पडलेली हातोडी घेऊन आपलीं मूर्ति विद्रूप करीत आहे याची प्रथम कल्पनाही आली नाहीं तिला. मग मात्र मूर्तिकडे दृष्टी गेली कीं तिला त्याचा मनस्वी राग येई. पण त्याच्याकडे पाहतांच तो राग कुठल्या कुठें पळून जाई.

हां हां म्हणतां त्या मूर्तीभोंवतीं बालकेंही जमली. त्या पुरुषानें तीं कुठून आणलीं कुणाला ठाऊक ! प्रत्येक बालक ती हातोडी घेई आणि छिन्न विछिन्न झालेली ती रतीची मूर्ति अधिकच विद्रूप करून टाकी. त्या पुरुषाचा असा विलक्षण राग आ[illegible] तिला ! तिला वाटलें—कुठून तरी विष आणावं आणि तें त्या[illegible] पाजून—'

त्याच्याप्रमाणें तिचेंही स्वप्न इथेंच भंग पावलें होतें.

ती थरथर कांपत असलेली पाहून त्यानें विचारलें ‘ अशी कांप-तेस कां ? काय दिसलं तुला स्वप्नांत ? ’

‘ तुह्मांला कुणीतरी विष—’ पुढें तिला बोलवेना. तिनें भीतीनें त्याला घट्ट मिठी मारली.

तो म्हणाला ‘ मलाही तसलंच स्वप्न पडलं एक. कुणीतरी तुला विष—भित्री कुठली ! तुला आणि मला कुणी विष घातलं ह्मणून आह्मीं मरणार आहोंत कीं काय ? ’

त्याच्या म्हणण्याचा रोंख तिच्या लक्षांत आला नाहीं. पण त्याच्या हंसऱ्या शब्दांनीं तिची भीति मात्र नाहींशी झाली.

तो हंसत हंसत म्हणाला ‘ आपल्याजवळ अमृत आहे कीं ! ’

‘ कुठं ? ’ असा प्रश्न तिनें डोळ्यांनीं केला. या प्रश्नाचें उत्तर त्यानें ओठांनीं दिलें.

त्या अमृताच्या चिमुकल्या पेल्यांत त्यांना स्वप्नांत विष देणाऱ्या मूर्तीच काय, जगांतली सर्व दुःखें बुडून गेलीं.

१९३८